


मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास

# राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



नोंदणी क्र. एफ.१६०१४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ५२ । अंक ११ । ऑगस्ट १९९९
आषाढ-श्रावण, शके १९२०
किंमत रु. २०/-
वार्षिक वर्गणी रु. २००/-



## *नवभारत*ची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* *नवभारत*, ऑक्टोबर, १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



**संपादकीय पत्रव्यवहार :**
वसंत पळशीकर
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ,
वाई - ४१२ ८०३ (जि. सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
श्री.ग. दीक्षित
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई - ४१२ ८०३ (जि. सातारा)



अनुक्रमणिका







# नवभारत

## अ नु क्र म



मुखपृष्ठ : सुजित पटवर्धन

# ग्रॅहम स्टेन्स यांचे बलिदान सार्थकी लागायला हवे

ख्रिश्चन मिशनरी ग्रॅहम स्टेन्स व त्यांची दोन कोवळ्या वयाची मुले यांची रात्रीच्या अंधारात अमानुषपणे जिवंत जाळून हत्या झाली. या हत्याकांडामागे कोणाचा हात होता, संघटित कट करून हत्या केली का याची चौकशी करण्यासाठी न्यायमूर्ती वधवा आयोग नेमला गेला. या आयोगाचा अहवाल अलिकडे लोकसभेला सादर करण्यात आला. हा अहवाल आम्ही अद्यापि पाहिलेला नाही. या अहवालावरील दोन लेख आमच्या वाचण्यात आले आहेत. कोणत्याही ख्यातनाम व प्रतिष्ठित अखिल भारतीय वा प्रादेशिक धार्मिक, धार्मिक-राजकीय वा राजकीय संघटनेचा अधिकृत स्वरूपात या कृत्यात पुढाकार वा सहभाग होता या निष्कर्षाला न्या. वधवा पोचलेले नाहीत. असा निष्कर्ष काढण्यासाठी ज्या प्रकारचा पुरावा, न्यायालयीन कसोट्यांवर टिकेल असा पुरावा लागतो. असा पुरावा त्यांच्यासमोर आला नाही.

या संदर्भात बजरंग दल या संघटनेचे नाव विशेषेकरून घेतले जात होते. स्वतःची ओळख हिंदुत्ववादी म्हणून करून देण्यात गर्व बाळगणाऱ्या संघटनांपैकी बजरंग दल ही एक कडवी, आक्रमक संघटना आहे. ठोकशाही पद्धती अवलंबण्याबद्दल या संघटनेचा लौकिक आहे. न्या. वधवा यांनी बजरंग दल वा अन्य कोणत्याही संघटनेला दोषी ठरविले नाही या कारणाने हिंदुत्ववादी पक्ष समाधान पावेल तर हिंदुत्ववादाच्या विरोधी असलेल्या पक्षाचा तीव्र रोष होईल. ही अपेक्षित अशीच प्रतिक्रिया म्हणायला हवी.

दिल्ली अल्पसंख्यांक आयोगाचे सभासद वालसान थांपू यांची 'इंडियन एक्स्प्रेस' या दैनिकामध्ये (१८ ऑगस्ट १९९९) 'मर्डर ऑफ अ मिशनरी : वधवाज बामी इफेक्ट' या मथळ्याचा लेख प्रसिद्ध झाला आहे. हे एक नामवंत ख्रिस्ती धर्मोपदेशक आहेत. वधवा आयोगाने अहवालात नोंदविलेल्या पुराव्याची, व त्या आधारे काढलेल्या निष्कर्षांची या लेखात जी दखल घेतलेली आहे ती पुढील गोष्टी समोर ठेवते : (१) हे हत्याकांड घडवून आणण्यात पुढाकार असलेला दारासिंग हा ओरिसा राज्यातील मयूरभंज व केंओजहर जिल्ह्यांमध्ये त्याच्या हिंस्र गुन्हेगारी कृत्यांसाठी कुप्रसिद्ध होता. अलीकडच्या काही वर्षांमध्ये त्याचा लौकिक व दरारा झपाट्याने वाढत गेला. (२) त्याच्यावर गंभीर स्वरूपाच्या ११ गुन्ह्यांसाठी आरोपपत्र ठेवलेले होते. तरीदेखील तो आणखी आणखी गुन्हे करण्यासाठी मोकळाच होता. पोलिस खात्यातल्या मंडळींशी त्याचे 'सलोख्या'चे संबंध होते, असेही आढळते. (३) १९९७ अखेर पर्यंत दारासिंगला गुन्हेगारी कृत्यांच्या संदर्भात अटक होत असे व त्याची सुटका होत असे. १९९७ नंतर त्याने केलेल्या गुन्हेगारी कृत्यांच्या संदर्भात त्याला एकदाही अटक करण्याचे धाडस पोलिसांनी दाखविले नाही. चंदनाचा चोरटा व्यापार करणाऱ्या वीरप्पन-सारखा तो 'भूमिगत'पण नव्हता. स्टेन्स हत्याकांडानंतरही तो मुक्तपणे वावरत होता, आणि कोणत्या एका दूरदर्शन कंपनीने त्याची मुलाखतही घेतली. पण पोलिसांना मात्र तो 'अदृश्य' राहिला व ते त्याच्यापर्यंत पोचू शकले नाहीत. (४) दारासिंग कडवा माथेफिरू धर्मवादी (वधवा आयोगाचे शब्द. "rabid fundamentalist") होता आणि त्याने आदिवासींना स्टेन्स यांची हत्या करण्यासाठी उद्युक्त केले, कारण ख्रिश्चन मिशनऱ्यांच्या धर्मप्रसारकार्याला त्याचा विरोध होता. (५) त्याचे स्थानिक पातळीवरील बजरंग दल व भाजप या संघटनांशी संबंध होते, व त्यांची साथ त्याला असे हे किमान एका प्रकरणी (पाटणा पोलिस स्टेशन केस नं. ८०/ दि. १९ ऑक्टोबर १९९७) आयोगाला आढळून आले.

वालसान थांपू यांनी आयोगाच्या अहवालाचा विपर्यास केला असेल हे शक्य वाटत नाही.

स्टेन्स यांची हत्या ही कोणत्या एका संघटनेने पूर्वनियोजित कट करून केलेली कृती नव्हती; ती एका विशिष्ट विचारव्यूहाच्या प्रभावाखाली असलेल्या, गुन्हेगारी कृत्यांना सरावलेल्या व सोकावलेल्या व्यक्तीने पुढाकार घेऊन केलेली निंद्य कृती होती, हा न्या. वधवा यांचा निवाडा स्वीकारावयास हवा.

पण, याचा अर्थ, दारासिंग याचे कृत्य एका माथेफिरू गुन्हेगाराचे 'व्यक्तिगत लहरी कृत्य' असे म्हणून बाजूला सारता येते, वा सारणे योग्य ठरते असे नाही. दारासिंग याचा

अनुक्रमणिका






'माथेफिरू'पणा एका विचारव्यूहाशी व विशिष्ट उद्दिष्टांशी जोडलेला होता याकडे दुर्लक्ष करून कसे चालेल?. या विचारव्यूहाची एक मांडणी अशी आहे की जी माणसांमधील हिंस्र विकार व उन्माद यांचे पोषण करते, त्यांना हिंसक व आक्रमक कृतीसाठी उद्युक्त करते, व अशा हिंस्र, निर्दय कृत्यांचे समर्थनच नव्हे तर कौतुकही करते.

'आमच्या परिवारातील कोणत्याही संघटनेने हे कृत्य करण्याची योजना केली नव्हती, अधिकृतपणे हे कृत्य करण्यास उद्युक्त केले नव्हते हे वधवा आयोगाच्या अहवालाने सिद्ध झाले', असे आत्मसंतुष्ट उद्गार हिंदुत्ववादी संघटनांनी काढणे अयोग्य होईल. मुद्दा केवळ तेवढाच मर्यादित नाही. 'निरागस आदिवासींचे धर्मांतर मिशनरी घडवून आणीत आहेत आणि (त्यांना ख्रिश्चन बनवून) आपली संस्कृती व धर्म यांचा नाश करीत आहेत; तर, चला, आपण त्यांच्यावर हल्ला करू या' अशा शब्दांत दारासिंगने आवाहन केल्याचे अहवालात नमूद असल्याचे थांपूंनी लिहिले आहे. ("Let us go and assault the Christian Missionaries.... as they are indulging in conversion of innocent tribals to Christiarity and spoiling our religion and culture." – आयोगाचे शब्द) दारासिंगच्या कृत्याला या देशातील अनेकांचा मूक्त वा प्रकट पाठिंबा असल्याचे भानही न्या. वधवांना आहे असे त्यांच्या पुढील म्हणण्यावरून दिसते. ग्रॅहम स्टेन्स यांच्या पत्नी ग्लॅडिस स्टेन्स यांच्या धीरोदात्त व क्षमाशील सुजाण भूमिकेची प्रशंसा करून ते म्हणतात, "त्यांच्या वर्तनाने त्यांनी, ज्यांनी गुन्हा केला त्यांनाच तेवढे लाजविले - शरम वाटण्याचा गुण अद्यापि शिल्लक उरला असेल तर – आहे असे नाही, पण ज्यांच्या मनात या गुन्हेगारांविषयी प्रत्यक्ष-अप्रत्यक्षपणे सहानुभूती असेल त्यांनाही त्यांनी (ग्लॅडिसबाईंनी) लाजविले आहे." ("By her conduct, she has put to shame, if they have any shame, not only the perpetrators of the crime but those who directly or indirectly may have sympathy with them.") ज्या जातकुळीच्या हिंदुत्ववादाचे फलित म्हणून माणसांची असंस्कृत, अमानुष कृत्यांनी, वोलण्याने वाटणारी शरमच संपुष्टात येते, शरमिंदे होण्याचा मानवी गुणच नष्ट होतो त्या जातकुळीची हिंदुत्ववादी प्रवृत्ती निर्मूल कशी होईल, हा मुद्दा शिल्लक उरतोच, आणि तोच वास्तविक महत्त्वाचा आहे.

हिंदू धर्म, संस्कृती व परंपरा यांचा अभिमान ज्यांना आहे, आणि या देशात हिंदू समाजाला – याचे मध्यवर्ती स्थान व वजन प्राप्त व्हायला हवे असे ज्यांचे म्हणणे आहे, त्यांच्यापैकी नीतिमान व सुसंस्कृत व्यक्तींना तरी वधवा आयोगाच्या अहवालाने खडबडून जाग यायला हवी आहे. कारण दारासिंग-सारखी माणसे व त्यांची कृत्ये यांचा त्यांच्या मनातील हिंदुत्वाला सर्वात जास्त धोका आहे याचे भान त्यांना असेलच. आणि भान नसले तर ते लौकरात लौकर येण्याची नितांत गरज आहे. माणुसकीचा मुडदा पाडण्यात गौरव मानणारे हिंदुत्व हिंदूंचे तरी कोणते भले करू शकणार आहे?

ग्रॅहम स्टेन्स व त्यांची बाळे यांची हत्या ही एका विचार-व्यूहाच्या एका धारेची, वृत्ती-प्रवृत्तीचीं तर्कशुद्ध परिणती आहे; अंतिम टोक आहे. असे कृत्य दारासिंग उत्साहाने व पूर्ण आत्मविश्वासाने करतो याचा अर्थ समाजात हे विप वऱ्यापैकी भिनले आहे याची त्याला खात्री वाटली असली पाहिजे.

हिंदुत्वाचा पक्ष घेणाऱ्या विचारी, समंजस, उदार व शहाण्या व्यक्तींनी – अशा व्यक्ती आहेत अशी आशा आम्ही बाळगतो – आपल्यातीलच माथेफिरू पक्षाच्या विरुद्ध आघाडी उघडली पाहिजे. ते त्यांचे कर्तव्य ठरते.

ग्लॅडिस बाईचे पती ग्रॅहम स्टेन्स यांनी, ख्रिश्चन व्यक्ती व संस्था यांच्यावरील अलीकडील हल्ल्यांच्या संदर्भात ग्लॅडिसबाईंना म्हटले होते, "येशूने जसे त्याचा छळ मांडणाऱ्यांना क्षमा केली तशी क्षमा ख्रिश्चनांनी हल्लेखोरांना करायला नको का?"* दहा दिवसांनी स्वतः स्टेन्स यांची व लहानग्या मुलांची हत्या झाली. क्षमा करणे ही जर येशूची शिकवण अनुसरावयाची असेल तर मग या दारूण प्रसंगातही ती अनुसरायला हवी. ग्लॅडिसबाईंच्या हृदयाची काय कालवाकालव झाली असेल याची कल्पनाही करणे कठीण आहे. पण येशूची शिकवण व प्रत्यक्ष वर्तन त्यांनी शिरोधार्य मानले, आणि उदार अंतःकरणाने अपराध्यांना क्षमा केली.

---

* *नवभारत*च्या याच अंकातील सिद्धार्थ यांच्या लेखात ग्लॅडिसबाई स्टेन्स यांना असे म्हणाल्या, असे आले आहे. इतके नक्की की, दोघांमध्ये हे वोलणे झाले.

अनुक्रमणिका

न्या. वधवा यांनी त्यांच्या अहवालाच्या शेवटी ग्लॅडिस-वाईंचा यथोचित गुणगौरव केला आहे व म्हटले आहे, "आपल्या दिवंगत पतीचे कार्य पुढे चालू ठेवण्यासाठी आपल्या मुलीवरोबर भारतातच राहण्याचा निर्णय घेऊन ग्लॅडिसवाईंनी मोठी हिंमत प्रकट केली आहे. त्यांच्या निर्णयाला आयोगाचा पूर्ण पाठिंबा आहे, आणि गरीवांची सेवा करण्याच्या आणि निर्भयपणे ख्रिस्ताची शिकवण लोकांपर्यंत पोचविण्याच्या त्यांच्या प्रयत्नात त्यांना शक्ती लाभो अशी आम्ही सदिच्छा व्यक्त करतो." ('The Commission is with her in her resolve and wishes her strength and support in her endeavour to serve the poor and spread the Gospel without any fear.') ख्रिस्ताच्या शिकवणुकीचा प्रसार लोकांमध्ये करण्यास तुम्ही मोकळ्या आहात, निर्भयपणे ते काम करा, असे वधवांनी म्हणावे हे विशेष आहे.

भारतीय राज्यघटनेने धर्मप्रसार व धर्मांतर यांचे स्वातंत्र्य नागरिकांना दिले आहे. या स्वातंत्र्याचा योग्य आदर हातचे राखून न ठेवता करण्यास विचारी, समंजस व शहाण्या हिंदुत्ववाद्यांनी पुढे यायला हवे.

*नवभारत*च्या याच अंकात श्री. सिद्धार्थ यांच्या एका लेखाचा अनुवाद प्रसिद्ध केला आहे. त्या लेखावरून, व वालसन थांपू यांच्या लेखावरूनही, मनात काही प्रश्न उपस्थित झाले. दारासिंग या व्यक्तीने जोडीला फक्त एकदोन व्यक्तींना घेऊन हे कृत्य केले असे दिसत नाही. जमावाने केलेले हे कृत्य होते. दारासिंग उघड उघड आवाहन करीत होता, लोकांना उद्युक्त करीत होता. या माणसाचे पूर्वचरित्रही हिंसक गुन्हेगारी कृत्ये करणारे आहे ही गोष्टही त्या भागात माहीत होती. प्राणांतिक हल्ल्याचा धोका आहे हे जाहीर झाले असताही, (१) त्याचा प्रतिकार करण्यासाठी मिशनरी मंडळींनी त्यांचे कार्य असलेल्या आदिवासी व अन्य लोकांना गोळा का केले नाही?, (२) ग्रॅहम स्टेन्स त्यांच्या दोन कोवळ्या मुलांना घेऊन बाहेर जीप (वा तत्सम) वाहनात रात्री का झोपले? त्यांना आपल्यासोवत घरांमध्ये झोपण्याचा आग्रह झाला नाही का?, आणि (३) जमाव स्टेन्स व त्यांची मुले यांची हत्या करीत असताना, काय घडत आहे याची कल्पना असलेली काही माणसे तरी त्यांचा बचाव करण्यासाठी धावून का गेली नाहीत? की, मनोहरपुरला जमलेल्या आपण मंडळींवर प्राणांतिक हल्ला होण्याची दाट शक्यता माहीत झाल्यावर, विचारपूर्वक, स्वेच्छापूर्वक दारासिंग व त्याने गोळा केलेला जमाव यांच्या हिंस्र उन्मादाला सामोरे जाऊन स्वतःच्या व मुलांच्या वलिदानाने, ख्रिस्ताच्या शिकवणुकीच्या प्रत्यक्ष आचरणाने, भारतातील आजचे वाढते द्वेषपूर्ण व हिंस्र वातावरण, प्रेममय व शांतिपूर्ण वनविण्याचा सम्यक् मार्ग स्टेन्स दाखवून देत होते?

आमचा असा तर्क आहे की प्रस्थापित ख्रिश्चन मिशनरी मंडळी, दलित-शोषित-आदिवासींमध्ये संघर्षप्रवण जनसंघटन उभारण्याचे तसेच परिवर्तनाचे कार्य करणाऱ्या ख्रिश्चन स्वयंसेवी संस्था व त्यांमधील कार्यकर्ते (ॲक्टिव्हिस्ट्स्) आणि स्टेन्स यांच्या भूमिकांमध्ये, भाषेमध्ये, कार्यपद्धतीमध्ये मूलभूत अंतर होते. 'हे दयाघन प्रभो, त्यांना क्षमा कर' असे म्हणण्याला, खरोखरच तशी क्षमाशील भूमिका घेण्याला आज या मंडळींमध्ये पाठिंवा अपवादभूतच मिळेल. 'एवढी क्षमेची भाषा ख्रिस्ताचे नाव घेऊन करीत आहात, तर आचरण करा ना तसे स्वतः' असे काही आव्हान तर त्यांना दिले गेले नव्हते, त्यांच्याच जातभाईंकडून?

वालसन थांपू यांच्या लेखातील पुढील दोन वाक्ये सूचक व अर्थगर्भ आहेत : "Those who speak for the political and religious lobbies, on the contrary, see it as a crime whose political scope outweighs its spiritual significance. This is a sacrilege to those who know Gladys, and the spiritual meaning of the work that the Staines couple has been doing in Orissa."

हिंदुत्ववादी पक्षाच्या विरोधातील ख्रिश्चनधर्मीय तसेच सेक्युलर, पुरोगामी, डावे दवावगट हेही थांपू यांच्या नजरेसमोर असावेत. या मुद्याच्या खोलात ते, दुर्दैवाने, गेलेले नाहीत. पण 'सॅक्रिलेज' हा शब्द महत्वाचा आहे.

दारासिंग व त्याने गोळा केलेला जमाव यांचे कृत्य अधमच राहते. शासनाचे कर्तव्य व जबावदारी गुन्हेगारांना अटक करून 'कायद्याच्या राज्या'च्या चौकटीत योग्य ती शिक्षा करणे हेच राहते, आणि ते शासनाने पार पाडायलाच हवे. पण स्टेन्स व त्यांची मुले यांचे वलिदान कारणी लागले असे त्यामुळे होणार नाही. ते कारणी लागावयाचे तर त्याचा राजकारणी फायदा उठविण्याचा मोह हिंदुत्ववादी तसेच

हिंदुत्ववादीविरोधी दबावगटांनी कटाक्षाने टाळला पाहिजे. हे थांपू यांचे म्हणणे योग्य आहे.

आपल्या भूमिका, आपली भाषा, आपली कार्यपद्धती, आपली उद्दिष्टे यांची परीक्षा अंतर्मुख होऊन जशी हिंदुत्ववाद्यांनी करावयास हवी तशी ती त्यांच्या विरोधकांनीही.

दुर्दैवाने, भारतीय समाजजीवनात जे जे विपरीत, अनिष्ट, घातक, विध्वंसक घडत आहे त्याच्यासाठी स्वतःसोडून इतरांना अपराधी ठरविण्यावर आज कटाक्ष आढळतो.

ग्लॅडिस स्टेन्स यांनी आचरलेला मार्ग थोडा वेगळा आणि निश्चितच अधिक उन्नत नैतिक व आदर्शाच्या जवळ जाणारा आहे. कोणाचा अपराध कोणता व किती याचा हिशेब मांडावयाची गोष्ट त्यांनी हृदयातून काढून टाकली. इतकेच नाही, क्षमाशील वृत्तीने, प्रेममय माणुसकीने ओतप्रोत होऊन त्यांनी लोकांच्या सेवेचे व्रत पुढे अखंड चालू ठेवण्याचे शांत चित्ताने ठरविले.

माणुसकीचा मुडदा पाडू पाहणाऱ्यांना पराभूत करण्याची ही श्रेष्ठतम रीत. एका गालावर थप्पड मारली तर काय करावे? दुसरा गाल पुढे करावा, असे ख्रिस्त म्हणाला होता, त्याची आठवणही व्हावी.

***वसंत पळशीकर***

---

**चुकीची दुरुस्ती :**

*नवभारत,* जुलै १९९९ च्या अंकात संपादकीय छापलेल्या पानांमध्ये चुकीने अंकाचा महिना 'मार्च' छापला गेला आहे. वाचकांनी कृपया याची नोंद घ्यावी ही विनंती. – संपादक

---

## लेखक-परिचय

- **सिद्धार्थ** : १९७० नंतरच्या दशकात ख्रिश्चन युवक चळवळीतील एक मार्क्सवादी पुढारी; वैचारिक प्रबोधन व लोकजागृती या क्षेत्रात स्वयंसेवी संस्थेमार्फत कार्य; बौद्ध विचारव्यूह स्वीकारून *पीपल* ट्री या स्वयंसेवी संस्थेमार्फत आंतरराष्ट्रीय सामंजस्य, सौहार्य व शांती यांच्या प्रस्थापनेसाठी कार्य. बंगलोर येथे वास्तव्य.

- **फ्रॅन्सिस दिब्रिटो** : (कॅथलिक) जेसुइट भिक्षू संघाचे सभासद; वसई परिसरातील 'हरित वसई' चळवळीचे पुढारीपण; मराठी साहित्य व संस्कृती हा महाराष्ट्रातील ख्रिस्ती बांधवांचाही तेवढाच वारसा आहे या भूमिकेतून मराठी संतसाहित्याचा अभ्यास; मराठीतून विपुल लेखन; 'सुवार्ता' मासिकाचे संपादक. **पत्ता** : 'गिरीज', वसई, जि. ठाणे.

- **विश्वनाथ खैरे** : केंद्रीय सार्वजनिक बांधकाम खात्यातून अभियंते म्हणून निवृत्त; संस्कृत, मराठी, तमिळ या भाषांच्या आंतरसंबंधाचा विशेष अभ्यास. प्राचीन मिथ्यकथा, महाकाव्ये-पुराणे, प्राचीन भारतीय संस्कृती व परंपरा या विषयांमध्ये वैशिष्ट्यपूर्ण मौलिक लेखन; *एकलव्य, युरेका, वंशाचा व्यास* (नाटके), *भारतीय मिथ्यांचा मागोवा*, *ज्ञानेश्वरांचे चमत्कार* इत्यादी ग्रंथांचे कर्ते. **पत्ता** : ३७४, सिंध सोसायटी, पुणे ४११ ००७.

- **ना.वि. कानेटकर** : स्थापत्य अभियांत्रिकीच्या क्षेत्रात लक्षणीय बांधकामे पार पाडणाऱ्या कानेटकर अँड असोसिएट्स कंपनीचे प्रमुख. **पत्ता** : 'मुक्ता', सर्व्हे क्र. १०५, एफ्‌पी क्र. ६४/१, एरंडवणे, पुणे ४११ ००४.

- **वेणू पळशीकर** : अर्थशास्त्र विषयाच्या निवृत्त प्राध्यापिका, 'नैसर्गिक शेती'चे प्रणेते मासानोबु फुकुओका यांच्या *वन स्ट्रॉ रेव्होल्युशन* या जगविख्यात ग्रंथाचे मराठी भाषांतर (*एका काडातून क्रांती*); अन्य प्रासंगिक लेखन. **पत्ता** : १५० गंगापुरी वाई ४१२ ८०३ (जि. सातारा).

अनुक्रमणिका

# "बापा, त्यांना क्षमा कर...."*

**सिद्धार्थ**

"त्यांना वाचवण्यासाठी मी काही करू शकलो नाही," स्टेन्स कुटुंबियांचे एक मित्र डॉ. शुभंकर घोप म्हणाले.

पन्नाशीच्या आसपासचे ते एक ठेंगणे आणि डोक्याला टक्कल पडलेले गृहस्थ होते. मिशी लावून ते जर मिरवले असते तर Hercule Poirot या जगप्रसिद्ध डिटेक्टिव्ह पात्राच्या भूमिकेत ते चपखल बसले असते. डॉ. घोप वनस्पतीशास्त्रज्ञ होते आणि कटकच्या रॅव्हेन्शॉ महाविद्यालयात ते प्राध्यापक होते. त्यांनी पुढे सांगितले, "एका ऑस्ट्रेलियन स्नेह्यांबरोबर एका छोट्या खोलीत मी झोपलो होतो. मला दंगलीचा, काही आरडा-ओरड्याचा आवाज ऐकू आला. त्या खोलीला खिडक्या नव्हत्या. छोट्याशा झरोक्यातून मी फार काही बघू शकत नव्हतो. दोन जीप गाड्यांना गिळंकृत करू पाहणाऱ्या ज्वाला आणि काही अंधुकशा आकृती एवढेच काय ते दिसू शकले. तासाभरात सर्व सामसूम झाले. जमाव निघून गेल्यावर जीपगाड्यांना लागलेली आग विझवायचा आम्ही प्रयत्न केला. पण तेव्हां खूपच उशीर झाला होता. ग्रॅहॅम स्टेन्स आणि त्यांचे दोन मुलगे ओळखता येणार नाहीत इतके होरपळून निघाले होते."

"ग्रॅहॅमना आणि त्यांच्या दोन मुलग्यांना वाचवण्यासाठी तुम्ही अधिक लौकर मदत करू शकला नसता का?" असे मी घोपांना विचारले नाही. त्यांच्या मनाला अजूनही कुरतडणारी अपराधीपणाची भावना त्यामुळे फक्त वृद्धिंगत झाली असती. शिवाय असा प्रश्न करणे अवाजवी ठरले असते. कारण निर्धाराने पुढे ठाकलेल्या त्या जमावाचा विशेष प्रतिकार घोप आणि ते दुसरे गृहस्थ करू शकले नसते. इमारतीबाहेर जरी ते पडले असते तरी ग्रॅहॅमचेच दुर्दैव त्यांच्यावरही ओढवले असते.

ग्रॅहॅम आणि त्यांच्या दोन मुलांचे अवशेष न्यायालयीन तपासणीसाठी कटकला आणले तेव्हा त्यांचे देह कोणत्या अवस्थेत होते असे त्यावेळी तेथे उपस्थित असलेले स्टेन्स कुटुंबियांचे दुसरे एक स्नेही राजकुमार पंडा यांना मी विचारले. आपले शब्द अगदी नेमकेपणाने वापरत पंडा म्हणाले, "तेथे तीन शवपेटिका होत्या. ग्रॅहॅम स्टेन्स यांचा मृतदेह असलेली शवपेटिका फक्त तीन फूट लांबीची होती. आणि तुम्ही असं लक्षात घ्या की ग्रॅहॅम सहा फुटांपेक्षाही अधिक उंच होते. शवपेटिकेत फक्त सांधे निखळलेल्या अवस्थेतील त्यांच्या अस्थी होत्या. मुलग्यांचे अवशेषही पूर्णपणे होरपळून निघाले होते. आणि त्यापैकी एकाचे मुंडके धडापासून वेगळे पडले होते. पण त्यांच्या हाडांचे सांगाडे बरेचसे शाबूत होते."

स्वामी अग्निवेश आणि भारताच्या विविध भागांमधून आलेल्या दोनएकशे इतर माणसांसहित मी बारिपाड्यात होतो. ते दिवस कडक उन्हाळ्याचेच होते. उष्णतेची लाट आल्याचे आणि त्या लाटेमुळे दोन माणसे मृत्युमुखी पडल्याचे वृत्तपत्रांच्या अहवालांवरून समजत होते. ग्रॅहॅम स्टेन्स यांच्या आणि त्यांच्या दोन पुत्रांच्या स्मृतीला अभिवादन करण्यासाठी आम्ही तेथे आलो होतो. २३ जानेवारी १९९९ रोजी एका पिसाट जमावाकडून त्यांना जिवंत जाळण्यात आले. तो अकरा मार्चचा दिवस होता. म्हणजे ही दुःखद घटना होऊन अठ्ठेचाळीस दिवस उलटले होते. या कालावधीत ग्रॅहॅमच्या पत्नी ग्लॅडिस स्टेन्स यांचे रूपांतर एका साध्या गृहिणीमधून खंबीरपणा आणि दयाळूपणा यांच्या एकत्रित प्रतीकामध्ये झाले होते. स्वतः तीव्रतम मानसिक यातना भोगत असताना, मृतांची दफनक्रिया पुरी होण्यास थोडासा अवधी राहिला असतानाच आपल्या पतीची आणि आपल्या दोन लहान मुलांची हत्या करणाऱ्यांना ग्लॅडिस स्टेन्स यांनी जाहीरपणे क्षमा केली होती आणि बारिपाड्यातील सेवाकार्य तेथे राहून चालू ठेवण्याचा आपला निर्धार व्यक्त केला होता.

बऱ्याच वर्षांपूर्वी क्वीन्सलँड, ऑस्ट्रेलियातील ग्रॅहॅमनी कुष्ठरोगामुळे अतिशय विद्रूप झालेल्या बारिपाड्याच्या एका

---

* *सिद्धार्थ यांचा लेख हैदराबादहून प्रसिद्ध होणाऱ्या दैनिक 'डेक्कन हेराल्ड' मध्ये ४ एप्रिल १९९९ रोजी (रविवारची पुरवणी) प्रसिद्ध झाला. संपादक-प्रकाशक यांच्या सौजन्याने त्याचा अनुवाद येथे प्रकाशित करीत आहोत. – संपादक*

*अनुवाद : वेणू पळशीकर*






तरुणाचा फोटो पाहिला आणि त्यातून हे सर्व सुरू झाले. त्या युवकाची ती दुःखस्थिती पाहून ते इतके व्यथित झाले की तत्क्षणीच कुष्ठरोग्यांच्या सेवेसाठी वारिपाड्याला जाण्याचा निर्णय त्यांनी घेतला. १९६४ साली भारतात येण्यासाठी ग्रॅहॅम बोटीत बसले आणि आपल्या पंचविसाव्या जन्मदिवशी म्हणजे १८ जानेवारी १९६५ रोजी ते मुंबईला उतरले. मुंबईहून ते वारिपाड्याला जायला निघाले आणि पुढची चौतीस वर्षे त्यांनी तेथील कुष्ठरोगी आश्रमातील विकलांग सदस्यांची सेवा करण्यात घालवली.

१९८१ मध्ये ऑस्ट्रेलियाहून भारतभेटीसाठी आलेल्या ग्लॅडिसच्या रूपाने त्यांना आपली भावी पत्नी मिळाली. ग्लॅडिस यांच्या सरळ आणि मनमिळाऊ स्वभावामुळे ग्रॅहॅमना त्या आवडल्या. १९८३ मध्ये त्यांचा विवाह झाला. त्यांना एस्थर (Esther), टिमोथी (Timothy) आणि फिलिप अशी तीन मुले झाली.

आपण धर्मकृत्य करीत आहोत असा दंभ बाळगणाऱ्या दारासिंग आणि त्याच्या पथकाने ज्या काळरात्री ग्रॅहॅमना व त्यांच्या दोन मुलग्यांना जिवंत जाळले त्यावेळी ग्रॅहॅम ५८ वर्षांचे, फिलिप १० वर्षांचा आणि टिमोथी सहा वर्षांचा होता. तीन मुलांपैकी वाचलेली एकमेव एस्थर १२ वर्षांची होती.

आम्ही कुष्ठाश्रमाला भेट दिली तेव्हा एका बुटक्या, प्रसन्नमुख, गोल चेहऱ्याच्या गृहस्थांनी आम्हाला अभिवादन केले. सदर गृहस्थांनी एक लाल आणि पिवळ्या रंगाचा शर्ट परिधान केला होता. त्यांचा सुरकुतलेला चेहरा आणि आर्जवी हास्य यामुळे त्यांना पाहून मला मिकी रूनी (Rooney) या अमेरिकन नटाचे स्मरण झाले.

त्यांचे नाव जोशिया शोरेन (Josiah Soren) असे होते. आणि ग्रॅहॅम स्टेन्स यांनी कुष्ठसेवाकार्याची सुरुवात त्यांच्यापासूनच केली होती. कुष्ठरोगाने विद्रूप झालेला त्यांचा फोटो पाहून तरुण ग्रॅहॅमना भारताकडे प्रस्थान ठेवण्याची प्रेरणा मिळाली. संपूर्ण बरे झालेले जोशिया आता कुष्ठाश्रमाच्या सेवकवर्गाचे सदस्य आहेत. त्यांच्या हसऱ्या डोळ्यांकडे एक कटाक्ष टाकून माझ्या दक्षिणी हिंदीत मी त्यांना विचारले, "ग्रॅहॅम स्टेन्सबद्दल विचार करीत असताना त्यांची कसल्या प्रकारची मूर्ती तुमच्या मनश्चक्षूंपुढे उभी राहते?" जोशियांच्या हिंदीवर त्यांच्या उडिया भाषेतील उच्चारपद्धतीची झिलई चढली होती. "हसतमुख चेहरा," ते ताबडतोब म्हणाले. "ग्रॅहॅमबाबूंचा विचार मनात आला की, त्यांचा हसरा चेहरा माझ्यासमोर उभा राहतो. ते स्वतः नेहमी हसतमुख असत आणि इतरांनाही हसवायला त्यांना आवडत असे."

जोशिया ह्या नावावरून, ते ख्रिस्ती होते हे मला दिसू शकत होते. ग्रॅहॅम स्टेन्स लोकांना ख्रिस्ती बनवत होते असे गृहीत धरून त्यांची हत्या करण्यात आली होती. माझ्या मनात एका प्रश्नाने उसळी मारली आणि काहीशा संदिग्धतेने मी तो जोशियांना विचारला. आश्रमवासियांमधील ख्रिस्त्यांच्या एकूण संख्येबद्दल तो होता. जोशिया देतील त्या उत्तरावरून ग्रॅहॅम स्टेन्स यांच्याबद्दलचा निवाडा करण्याच्या धोक्यात आपण सापडत आहोत या गोष्टीमुळे माझे घुटमळणे उद्भवले होते. समजा, ग्रॅहॅम स्टेन्स यांनी सर्व आश्रमवासियांना ख्रिस्ती धर्माची दीक्षा दिली होती अशी माहिती मिळाली असती, तरी त्यामुळे त्यांची हत्या कमी भयानक ठरली असती का? आणि ग्रॅहॅम स्टेन्स यांनी कोणाला ख्रिस्ती बनवलं नाही असे आढळले तरच त्यांच्या निर्घृण हत्येमुळे माझ्या मनात निरपवाद प्रक्षोभ उफाळून येणार होता का? मला स्वतःला अनिष्ट वाटणारी धर्मपरिवर्तनाची प्रक्रिया वस्तुतः पूर्णपणे कायदेशीर आणि वाजवी (सयुक्तिक) होती. तिच्यामुळे उडालेल्या जळफळाटाच्या ठिणगीमुळे ती कपटी आणि निंद्य आहे अशा दृष्टिकोनातून तिच्याकडे पाहण्याच्या धोक्यात आपण सापडलो होतो याची जाणीव मला झाली.

"येथे असलेल्या ऐंशी आश्रमवासियांपैकी आम्ही सातजण ख्रिश्चन आहोत," या जोशियांच्या उत्तराने मला सुटल्यासारखे वाटले, हे मला कबूल केलेच पाहिजे.

गेले काही दिवस ग्लॅडिस स्टेन्सना भेटायला येणाऱ्यांचा ओघ सतत चालू होता. मी तेथे असताना सरकारी नोकरीतील एक जुन्या कौटुंबिक स्नेही श्रीमती रेड्डी यांनी भेटीला येणाऱ्यांची व्यवस्था पाहण्याचे कार्य आपल्याकडे घेतले होते. श्रीमती स्टेन्सना त्यांची फारच मदत होत होती. आपले काम श्रीमती रेड्डी धाक वाटाव्या अशा कार्यक्षमतेने बजावत होत्या. भेटीला येणाऱ्यांसाठी वापरावयाच्या घरातील शिलकी खोलीत ग्लॅडिस स्टेन्स मला प्रथम भेटल्या तेव्हा सायंकाळचे आठ वाजले होते. मोठ्या हाडापेऱ्याच्या, चष्मा घातलेल्या, आणि नितळ सोनेरी कांतीच्या अशा त्या होत्या. नेहमीचा सराव असल्याप्रमाणे त्यांनी एक सुती साडी परिधान केली होती. वृत्तपत्रांमधील त्यांचे फोटो पाहून त्या मख्ख चेहऱ्याच्या आणि सामान्य

स्वरूपाच्या असाव्यात असे वाटत होते. प्रत्यक्षात त्या एक मोहक आणि आकर्षक व्यक्ती होत्या. त्या बोलत असताना त्यांचे निळे डोळे चैतन्याने उजळत राहत. मी सोडून इतरही काहीजण त्यांना भेटायला तेथे आले होते. त्यामध्ये एक उंचेपुरे, दाढीवाले, डोक्यावर फेटा वगैरे काही न घातलेले पंजावी गृहस्थ होते. *जुन्या करारा*तल्या एखाद्या पात्रासारखे ते वाटत होते. सलवार-खमीज घातलेली एक स्त्री त्यांच्याबरोबर आली होती. त्या स्त्रीच्या कडेवर एक लहान मुलगी होती. ती तिघे जालंदरपासून शेकडो किलोमीटरचा आगगाडीचा आणि बसचा प्रवास करून तेथे आली होती. ग्लॅडिस स्टेन्सना ती अपरिचित होती. कोणतीही पूर्वसूचना न देता ती अचानक येऊन धडकली होती.

एकदोन महिन्यांपूर्वी वारिपाड्याचे नाव सुद्धा कोणी ऐकले नव्हते. ते आता यात्रिकांचे यात्रास्थान बनल्यासारखे वाटत होते. ग्लॅडिसच्या चरणांना स्पर्श करून ती स्त्री ओक्सावोक्शी रडू लागली. मृदु स्वरामध्ये तिच्याशी बोलून ग्लॅडिसने तिला अशांत न होण्याबद्दल विनविले. "माझ्या कातडीचा रंग भिन्न असला, तरी मी भारताला आपला देश मानले आहे. आणि भारतात राहणाऱ्या व्यक्तीला मरण आपल्या जीवनाचा (नेहमीच्या जगण्याचा) एक भागच वाटतो. रोगाने, अपघाताने आणि इतर कारणांनी भारतात रोजच असंख्य लोक मरत असतात. मृत्युमुळे झालेल्या हानीने असंख्य कुटुंबे शोकग्रस्त होताना मी रोज पाहात असल्यामुळे असे नुकसान भोगणारी मी काही एकटीच नाही हे मला उमजते. जे घडले ते सतत उगाळत न बसण्याचा मी प्रयत्न करते. जेव्हां मी बराच वेळ जे घडले त्याच्यावर रेंगाळण्यात घालवते तेव्हां मला अस्वस्थ व्हायला होते. पण मी दीर्घ काळ खचून जात नाही. कारण ग्रॅहॅम आणि माझे मुलगे मला स्वर्गात एक दिवस भेटणार आहेत हे मला ठाऊक आहे. ही आशा जर नसती तर जगण्यात मला फार अर्थ वाटला नसता." ग्लॅडिस म्हणाल्या.

दुसऱ्या दिवशी सकाळी वारिपाड्याच्या व्यापारी उलाढालीचे मुख्य केंद्र असलेल्या 'कचेरी पथा'वरून स्वामी अग्निवेशांच्या निर्भय शांतिसैनिकांचे पथक चालले असताना त्यांच्यामध्ये मी सामील झालो. तो एक चिंचोळा (निरुंद), धुळीने माखलेला रस्ता होता. असंख्य पादचारी आणि तेवढ्याच संख्येने असलेले सायकलस्वार त्यावरून ये-जा करत होते; मोटरगाड्यांची वाहतूक तुरळक होती आणि सार्वजनिक वाहतुकीसाठी सायकलरिक्षा हे साधन पसंत केले जात होते. काठीला अडकवलेल्या एका फलकावर 'दिल्ली ते मनोहरपूर' असे लिहिले होते आणि त्याच्या खालच्या बाजूस " 'सामाजिक न्यायासाठी लढणाऱ्या धर्मां'च्या संघटनेमार्फत आयोजित (मोर्चा)" असे लिहिले होते. प्रस्तुत संघटना स्वामी अग्निवेश यांनी नव्याने स्थापन केली होती.

मिरवणुकीतून त्यांच्याबरोबर जाणाऱ्यांत शे-दोनशे इतर लोक होते. त्यांमध्ये जैन, मुसलमान, हिंदू आणि ख्रिस्त्यांचा समावेश होता. त्यांपैकी सुमारे सत्तर लोक दिल्लीहून आगगाडीने आणि बसने आले होते आणि वीसजण हैदराबादेहून आले होते. इतर ठिकाणांहून छोटे छोटे समूह (गट) आले होते. प्रवासामध्ये त्यांना बरेचसे जागरण करावे लागले होते. त्यातले काहीजण वयाने सत्तरीच्या घरातले होते. असे हे सारे भारताच्या अंतर्भागात ग्लॅडिस स्टेन्सना आपला नैतिक पाठिंबा देण्यासाठी, कुष्ठाश्रमाला भेट देण्यासाठी, तसेच मृतांच्या दफनभूमीचे दर्शन घेण्यासाठी तेथे आले होते. ग्रॅहॅम स्टेन्स आणि त्यांचे दोन मुलगे यांची हत्या जेथे झाली त्या १८० कि.मी. दूर जंगलकिनारी वसलेल्या मनोहरपूर या गावी नंतर जाऊन तेथील प्रार्थना सभेत ते सर्वजण सामील होणार होते. वेठबिगार, दलित, बालकामगार, स्त्रिया आणि आदिवासी यांच्या वतीने स्वामी अग्निवेश हे सातत्याने हिंदू आवाज उठवीत आले आहेत.

ग्रॅहॅम स्टेन्स आणि त्यांचे दोन मुलगे यांच्या हत्येबद्दल (मृत्यूबद्दल) पश्चात्ताप व्यक्त करण्यासाठी ज्या ठिकाणी सार्वजनिक सभा आयोजित करण्यात येणार होती त्या टाऊन-हॉलकडे जायला मिरवणूक निघाली. सभा सुरू होण्यापूर्वी, अग्निवेशांबरोबर आलेले वालसान थांपू नावाचे प्रॉटेस्टंट चर्चचे धर्मोपदेशक माझ्याबरोबर आले.

स्टेन्स यांच्या घरापर्यंत आम्ही पोहोचलो तेव्हां पडद्या-आडूनच श्रीमती रेड्डींनी मला ओळखून माझ्याकडे असा काही दृष्टिक्षेप केला की मी पुन्हा भेटील येणे त्यांना मुळीच पसंत नव्हते हे मला कळावे. पण माझ्यामागे धर्मोपदेशकाच्या झग्यामध्ये आलेल्या वालसानना पाहून त्यांनी त्यांच्याकडे श्रांत स्मित केले. क्षणभरात श्रीमती स्टेन्स तेथे आल्या. या नामवंत धर्मोपदेशकांनी लिहिलेले ग्रंथ ग्लॅडिसनी वाचलेले होते. वालसान थांपूंच्या भेटीने ग्लॅडिसना अपार आनंद झाला.

वालसाननी ग्लॅडिस यांच्या चरणांना स्पर्श केला आणि आपण त्यांच्या दु:खात सहभागी असल्याचे सांगितले तेव्हा

मी आतल्या आत फार नाराज झालो. माझी ही प्रतिक्रिया माझ्यावर गतकाळात झालेल्या संस्कारांची परिणती असणे शक्य होते. पण त्यावेळची परिस्थिति वेगळी होती. आज जे लोक ग्लॅडिस यांच्या चरणांना स्पर्श करीत होते ते एका सत्प्रवृत्त आणि धैर्यशील स्त्रीवद्दल त्यांना वाटणाऱ्या पवित्र आदराचे प्रतीक म्हणून केवळ तसे करत होते, हे माझ्या नंतर लक्षात आले.

परंतु ग्लॅडिस यांचे संतपदाप्रत होणारे मार्गक्रमण खरोखर आणि चांगल्या रीतीने सुरू झाले होते. श्रीमती स्टेन्सची भेट होण्यापूर्वी सुद्धा 'मूर्तिमंत संत', 'जिवंत देहधारी संत' असा त्यांच्यावद्दल मित्रांनी केलेला उल्लेख माझ्या कानावर आला होता. कोणाला संतत्व वहाल करावे यावर विश्वास ठेवण्यापासून मी हजारो योजने दूर पोचलो होतो. तरीसुद्धा त्यांचा तसा उल्लेख योग्यच आहे असे मला वाटले.

"आपल्याला इजा करणाऱ्यांवद्दल सुद्धा क्षमाशील राहायला गुजराथमधील ख्रिस्त्यांनी शिकायला हवे, असे एकदोन महिन्यांपूर्वीच मी ग्रॅहमना सांगत होते" अशी आठवण ग्लॅडिस स्टेन्स यांनी काढली. एका जागेकडे वोट दाखवत त्या म्हणाल्या, "अगदी तिथेच त्यावेळी आम्ही उभे होतो. लौकरच असा प्रसंग आपल्यावर ओढवणार आहे याची त्यावेळी मला काहीच कल्पना नव्हती. क्रुसावर प्राणोत्क्रमण होत असताना येशू ख्रिस्तांनी पुकारा केला, 'माझ्या वापा, मला क्रुसावर चढवणाऱ्यांना क्षमा कर. कारण आपण काय करीत आहोत हे त्यांना कळत नाही.' आपणाला ठार करणाऱ्यांना येशूंनी क्षमा केली. प्रेम करणे म्हणजेच क्षमा करणे. येशूचे हे कृत्य आठवून माझ्या पतींना आणि मुलांना ठार करणाऱ्यांना क्षमा करण्याची प्रेरणा मला त्यातून मिळते." हृदय हेलावून टाकणारा तो क्षण होता आणि काय वोलावे ते आम्हाला कळेना.

काही वेळ गेल्यावर मी विचारले, "पण निष्पाप मुलांच्या हत्येचा स्वीकार करणे नक्कीच कठीण गेले असणार..." "होय तर. त्या लडिवाळांवर माझे अतोनात प्रेम होते. आणि माझ्या मुलीला — एस्थरला — आपल्या भावांची राहून राहून आठवण येते. त्यांच्यावाचून तिला फारच चुकल्या-चुकल्यासारखे वाटते. पण या अशा घटनांमागेही परमेश्वराचे काही हेतू असतात, जे आपणाला तावडतोव पूर्णपणे कळू शकत नाहीत, असे मी मानते," ग्लॅडिस म्हणाल्या.

त्या दिवशी सायंकाळी धर्मातरांच्या विवाद्य मुद्द्यावर विचार करताना ख्रिस्ती, हिंदू, मुसलमान किंवा इतर कोणत्याही धर्मामध्ये आदिवासींचे धर्मांतर करण्याची गरजच काय हा प्रश्न मला पडला हे मला कबूल केलेच पाहिजे. आदिवासींची स्वत:ची अशी विश्वव्यवस्थेविषयीची व्यापक तात्त्विक वैठक असते आणि ती इतर धार्मिक संप्रदायांमधील तत्सम तात्त्विक मांडणीशी समान पातळीवर असते; एवढेच नव्हे तर, काही वेळा त्याहूनही जास्त सरस असते, या खात्रीच्यापोटी माझी शंका निर्माण झाली होती.

आदिवासी जीवनपद्धती पर्यावरणावद्दल उत्कट आस्थेवाईक भाषा वापरणारी असून शिवाय ती अधिक समताशील आणि भिन्नलिंगीयांवद्दल अधिक संवेदनशील असते. वहुतेक सर्व आदिवासी संस्कृतींमध्ये पृथ्वीला माता मानतात. माता म्हणून तिला आदरणीय आणि पोषणीय (संवर्धनीय) मानतात. तिला प्रदूषित करणे वा तिची लूटमार करणे निषिद्ध मानतात. शिवाय ते स्पर्धेऐवजी सहकारावर अधिक भर देतात. स्पर्धा व्यक्तीला आपल्या सहकाऱ्यांवद्दल आणि शेजाऱ्यांबद्दल अतोनात असमाधानी आणि संशयी वनवून सोडत असली तरीसुद्धा, आपल्या जीवनपद्धतीला ती आधारभूत आहे असे आपल्यासारख्या 'सुधारलेल्या' लोकांना खात्रीलायकपणे वाटते.

ईश्वराची संकल्पना, मानवी समाज आणि निसर्ग यावद्दल कदाचित् आदिवासी आपल्याला एकदोन गोष्टी शिकवू शकतील. जर देव असेल तर तो सर्व धार्मिक आणि निधर्मी संप्रदायांमध्ये जेवढा क्रियाशील आहे तेवढाच तो आदिवासी जीवनदृष्टी व रीतींमधील सर्व सत्य-सुंदर-मंगल गोष्टींमध्येही क्रियाशील असतो असे निश्चितपणे म्हणता येईल. आदिवासी संस्कृतीतील या सत्य-सुंदरांच्या जागी नवी रूपके आणि प्रतीके घुसडण्याऐवजी गरज पडेल तेथे त्यांच्याच संस्कृतीतील ही सत्ये उलगडून विशद करण्यास मदतस्वरूप होणे हे काम भविष्यकाळात धर्माविषयी आस्था व उत्साह वाटणाऱ्यांनी करायला हवे.

गरीव जनतेच्या सेवेमध्ये ग्रॅहम स्टेन्स सारख्या ख्रिस्त्यांनी धडाडी आणि कळवळा प्रकट केला आहे. दुसऱ्या दिवशी कुष्ठनिवासातून जाताना आणि तेथील रहिवाशांशी वोलताना मन हेलावून गेले. वारिपाड्यातील मध्यमवर्गीय कुटुंवांना आणि चहाच्या दुकानांना आश्रमवासीयांनी चालवलेल्या डेअरीतून दूध विकले जाते. कुष्ठरोग्यांनी धार काढलेल्या पण पूर्णपणे सुरक्षित असलेल्या दुधामुळे शेकडो वर्षांपासून कुष्ठरोग्यांसंवंधी चालत आलेल्या कलुषित भावनेवर मात केली आहे. कुष्ठरोगी

काम करत असलेल्या एका विणकाम केंद्रामध्ये साड्या, चादरी आणि टॉवेल निर्माण केले जातात. संपूर्ण ओरिसा राज्यभर त्यांचा खप होतो.

दारातील पायपुसणी आणि पिशव्या बनवण्यासाठी स्थानिक परिसरात निर्माण केलेल्या एकप्रकारच्या गवताचा उपयोग केला जातो. सौंदर्यात्मक दृष्टीने बनवलेली एक लाल आणि हिरव्या रंगाची भक्कम अशी, बाजारहाट करण्यासाठीची पिशवी मी माझ्यासाठी खरेदी केली. आपल्याला गुरुस्थानी असलेल्या येशू ख्रिस्तांच्या शिकवणुकीचे अनुसरण करीत सेवाकार्यात रत असतानाच ज्यांना आपले बलिदान करावे लागले अशा एका विलक्षण ताकदीच्या आणि करुणामय वृत्तीच्या व्यक्तीची स्मृती जागवत ती पिशवी माझ्या स्वयंपाकघरात विराजत आहे. आपल्यापैकी काही जणांना आपल्या मृतप्राय सुस्तपणातून जाग येईल आणि निदान काही थोड्या काळासाठी त्यांना प्रेम आणि आशा यांचा साक्षात्कार होईल तर ग्रॅहॅम स्टेन्स यांचा मृत्यू सार्थकी लागेल. इस्टरच्या सणाचा तो गाभा आहे.

काही मंडळींचा जो आरोप आहे की भारतात ख्रिस्त्यांनी चालविलेल्या सेवाकार्याने लोकांचा घात होणार आहे तो बिनबुडाचा आहे. अशी कल्पना करणे बाह्यात्कारी योग्य वाटते. तवलीनसिंग या लेखिकेने आपल्या लिखाणात एके ठिकाणी म्हटल्याप्रमाणे, ख्रिस्त्यांना त्यांच्या निवडक क्षेत्रांमधून हुसकावून लावण्यासाठी त्यांच्यापेक्षा सरस सेवाकार्य करून त्यांच्यावर मात करणे हाच कदाचित सर्वोत्तम मार्ग ठरेल. दरिद्री आणि उघडपणे निराशाजनक परिस्थिती असलेल्या या देशामध्ये या बाबतीतली थोडीशी स्पर्धा सर्वांच्याच फायद्याची ठरेल.

लोकसंख्येच्या दृष्टीने विचार केला तरीसुद्धा ख्रिश्चन लोकांची संख्या धोकाजनक नाही. इतर जमातींमधील लोकसंख्या वाढीच्या दराच्या तुलनेत विचार केल्यास वास्तवात ख्रिश्चन लोकसंख्या घटते आहे असे अधिकृत सरकारी आकडेवारी दाखवते. आजच्या आकडेवारीनुसार भारतीय लोकसंख्येमध्ये ख्रिश्चनांचे प्रमाण केवळ दोन टक्के आहे. जवळ जवळ अगदी दुर्लक्षणीय प्रमाणावर होत असली तरी धर्मांतरे निश्चितच घडून येत आहेत. पण देशातील बहुसंख्य ख्रिश्चनांचा त्यांच्याशी सुतराम संबंध नाही; काही थोडे अतिउत्साही कडवे गट फक्त त्यात गुंतलेले आहेत.

धोक्याची सूचना देणाऱ्या काहीजणांनी धर्मांतरावर बंदी आणण्याच्या गरजेचे टुमणे चालू ठेवले आहे. तथापि हे जर कधीकाळी घडून आले तर आपल्यासाठी लोकशाहीच्या अंताची ती सुरुवात ठरेल. ख्रिश्चन, हिंदू, मुसलमान, बुद्ध, मार्क्सवादी किंवा निरीश्वरवादी बनण्याचा लोकांचा हक्क नाकारणे कसे शक्य आहे? ख्रिश्चन म्हणून जन्मलेला मी हिंदू धर्मातील आध्यात्मिकतेकडे तीव्रतेने आकर्षिला गेलो आणि सरतेशेवटी बौद्ध धर्माचे सखोल रसग्रहण करण्यापर्यंत माझी मजल गेली. ख्रिश्चन धार्मिक परंपरेकडून मला जी दृष्टी व जाण लाभली आहे त्याबद्दल मी कृतज्ञ आहे. परंतु आज मी स्वतःला ख्रिश्चन म्हणवून घेत नाही. भिन्न धर्मांपासून मिळणारी दृष्टी आणि सखोल अनुभूती ही त्या त्या धर्मांच्या अनुयायांची मालमत्ता नाही; अखिल मानवजातीचा तो सामूहिक वारसा आहे, असे मला वाटते.

माझे, आणि वाढत्या संख्येने इतरांचे, विविध धर्मांच्या अवगाहनाचे जे प्रवास (journeys) चालले आहेत त्यांच्यावर बंदी असावी का? काही थोडे लोक प्रलोभनांमुळे धर्मांतरित होत असतील; पण बहुसंख्य पीडित लोकांच्या बाबतीत, त्यांच्याबद्दल दाखवण्यात येणारा आदर आणि कळवळा हा धर्मांतरासाठी निर्णायक घटक असावा. आपल्या कल्याणामध्ये आंबेडकरांना सर्वाधिक रस आहे हे दिसल्यामुळे हजारोंच्या संख्येने महारांनी बौद्ध धर्मात प्रवेश केला नव्हता का?

ग्रॅहॅम स्टेन्स यांनी कोणाला धर्मांतरित केले होते का हे मला माहीत नाही. प्रेमभावाने त्यांना जोमदारपणे प्रेरित केले होते, असे मला स्पष्ट दिसते. अन्यथा, एखाद्या ऑस्ट्रेलियनाने स्वतःच्या घरचे सुख सोडून दारिद्र्याचा उच्चांक असलेल्या जगाच्या एका भागात चौतीस वर्षे कुष्ठरोग्यांसमवेत साधेपणाच्या जीवनाला कवटाळावे याचे स्पष्टीकरण कोण कसे करू शकणार? त्यांच्या पत्नी ग्लॅडिस यांनी कुष्ठरोग्यांची सेवा करत बारिपाड्यात राहण्याची इच्छा प्रकट करून लक्षावधी भारतीयांची अंतःकरणे आधीच जिंकून घेतली आहेत.

आपल्या पतीच्या आणि मुलांच्या मारेकऱ्यांना क्षमा करण्यामधून आपण केवळ येशू ख्रिस्तांचेच नव्हे तर बुद्ध, महावीर, कबीर आणि गांधी यांचेही अनुयायी असल्याचे ग्लॅडिस यांनी दाखवून दिले आहे. त्यांच्या जीवितकार्याचा हेतू आपल्यापर्यंत हा संदेश पोचवण्याचा आहे अशी आशा करू या.

अनुक्रमणिका

# धर्मांतर – काही मूलभूत प्रश्न

**फ्रॅन्सिस दिब्रिटो**

धर्मांतराविषयी खूप चर्चा होत आहे. या निमित्ताने मंथन होत आहे. अमृतावरोबर विषही वाहेर येत आहे. धर्मांतरासंबंधी काही मूलभूत प्रश्नांची चर्चा करण्याचा हा अल्प प्रयत्न आहे.

१. माणसाला न्याय सहजासहजी मिळत नाही. तो मिळवावा लागतो. त्यासाठी प्रसंगी संघर्ष करावा लागतो. स्वातंत्र्य हे असेच एक मूल्य आहे. स्वातंत्र्याचा संकोच करणे ही एक आदिम वृत्ती आहे. म्हणून व्यक्तीप्रमाणे समाज व राष्ट्रे ह्यांना स्वातंत्र्यासाठी झगडे करावे लागले आहेत. देशोदेशी झालेले स्वातंत्र्यलढे हे त्याचे पुरावे आहेत.

शीलाप्रमाणे स्वातंत्र्य जपावे लागते. अनेक मार्गाने आणि पद्धतीने स्वातंत्र्य हिरावून घेतले जाऊ शकते. म्हणूनच, 'अखंड जागरुकता हीच स्वातंत्र्याची किंमत आहे' असे म्हटले जाते.

स्वातंत्र्य उपभोगण्यासाठी विचारपूर्वक निवड करता आली पाहिजे. जिथे निवड नसते तिथे खरे स्वातंत्र्य नसते. निवडीच्या स्वातंत्र्यावद्दल एरिक फ्रॉम या विचारवंताने मौलिक लेखन केले आहे. अनेक पर्याय समोर असताना, त्यातील एकाची निवड करावी लागते.

एकतंत्री राजवटीत नागरिकांना निवडीचे स्वातंत्र्य नसते. तिथे एकच पर्याय असतो व तोच स्वीकारावा लागतो. फॅसिस्ट प्रवृत्तीचा निवडीच्या स्वातंत्र्याला विरोध असतो. त्यांना एका विचारप्रणालीचा, एका धर्माचा, एका राजकीय विचारसरणीचा समाज हवा असतो. निराळा विचार हा विद्रोह मानला जातो. अशा विद्रोहाचा विनाश करणे हा मग फॅसिस्टांचा एक कलमी कार्यक्रम ठरतो.

२. सक्ती करणे, आमिष दाखविणे, वळजवरी करणे म्हणजे स्वातंत्र्याचा मुडदा पाडणे होय. म्हणूनच, निवड करताना कुणावरही वरील प्रयोग केला जाऊ नये. सक्तीच्या मार्गाने केलेल्या मतपरिवर्तनाची किंमत शून्य आहे. विचारस्वातंत्र्यावरील तो मोठा घाला आहे. म्हणूनच सक्तीचे कधीही समर्थन होऊ शकत नाही.

माणसाची विवेकवुद्धी ही अंतिम आहे. या विवेकवुद्धीला साक्ष ठेवून माणूस जीवनातील महत्त्वाचे निर्णय घेत असतो. एखाद्या धर्माचा स्वीकार हा व्यक्तीच्या विवेकवुद्धीच्या अखत्यारीतील गोष्ट आहे. म्हणून कॅथलिक ख्रिस्तसभा आपल्या अधिकृत शिकवणीत म्हणते, "कुणावरही ख्रिस्ती धर्म स्वीकाराची सक्ती केली जाऊ नये. श्रद्धास्वीकार स्वभावतःच एक नियुक्त कृती आहे." [१]['Therefore no one is to be forced to embrace the Christian faith. The act of faith is of its very nature a free act.' (व्हॅटिकन २, पा. ६८९)]

३. विचारस्वातंत्र्य – त्यात धर्मस्वातंत्र्य आले – हा मानवी हक्कांच्या सनदेमधील एक प्रमुख हक्क आहे. या सनदेवर भारताने सही केली आहे. म्हणून धर्मस्वातंत्र्याच्या हक्काचे संरक्षण करणे हे आपल्या शासनाचे कर्तव्य आहे.

(धर्म) स्वातंत्र्याचा हक्क ही सवलत नाही किंवा सोय नाही. प्रत्येक सुजाण व्यक्तीला मानवी प्रतिष्ठेमुळे मिळालेले ते एक वरदान आहे. ईश्वराने दिलेले व सुजाण संस्कृतींनी व शासनांनी स्वीकारलेलं ते एक महत्त्वाचं कलम आहे.

४. धर्मांतर हा शब्दप्रयोग 'कन्व्हर्शन' या इंग्रजी शब्दाचे चुकीचे भाषांतर आहे. Metanoia हा मूळ ग्रीक शब्द आहे. ख्रिस्ती परंपरेत या शब्दाला खूप गहन अर्थ आहे. त्याचा अर्थ मनःपरिवर्तन, वृत्तीत आणि वागणुकीत झालेला आमूलाग्र वदल असा आहे. कन्व्हर्शन म्हणजे विकार आणि वासना यांच्यापासून दूर जाऊन, निरामयतेकडे केलेला प्रवास आहे.

मनःपरिवर्तन किंवा आत्मपरिवर्तन ही एक आध्यात्मिक प्रक्रिया आहे.

फांदीवर कळी उमलण्याइतकी ती नाजूक व सहज कृती आहे. रात्रीनंतर, निसर्गक्रमाने पूर्वचलावर तांवडे लाल विंव अवतरते. कुणी त्याला कृत्रिमपणे ढकलीत नसते. झाडावर पिकलेले फळ अलगदपणे खाली पडते. कारण त्याची पूर्ण

१. दुसऱ्या वाक्याचे भाषांतर मुळावरहुकूम नाही. 'श्रद्धेने ओतप्रोत कृती ही स्वभावतः स्वयंनिर्णयाच्या आधारे केलेली कृती असते', हे भाषांतर अधिक योग्य ठरेल. – संपादक.

अनुक्रमणिका

वाढ झालेली असते, पूर्ण विकास झालेला असतो. कुणाही माणसाला ख्रिस्ती धर्माचा स्वीकार करायचा असेल, तर त्यासाठी साधारण सहा महिन्यांचा अभ्यासक्रम पुरा करावा लागतो. त्यानंतर उमेदवाराची कसून परीक्षा घेतली जाते. केवळ ऐहिक लाभासाठी कुणी धर्मबदल करीत असेल तर त्याला ख्रिस्ती धर्माची दीक्षा मिळू शकत नाही. कॅथलिक कुटुंबात जन्मलेल्या बाळाला बाप्तिस्मा देण्यासाठी त्याच्या आईवडिलांना या दीक्षेची व त्यानंतर त्यांच्यावर व बाळावर येणाऱ्या जबाबदारीची पूर्ण कल्पना दिली जाते.

ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेताना सोबत दोन साक्षीदार (गॉडफादर, गॉडमदर) असणे आवश्यक असते. त्या दोन व्यक्तींनी नवागताला श्रद्धेच्या त्याच्या प्रवासात मदत करायची असते.

जीवनाला नवी दिशा देणारा अशा प्रकारचा आत्मिक बदल केवळ ईश्वराच्या कृपाप्रसादामुळेच शक्य असतो.

५. काही राज्यांत धर्मांतरविरोधी कायदे अंमलात आले आहेत. सक्ती केली जाते, प्रलोभने दाखविली जातात म्हणून असे कायदे केलेले आहेत.

वास्तविक, घटनेने दिलेल्या मूलभूत स्वातंत्र्यांत, धर्म-निवडीचे स्वातंत्र्य अनुस्यूत आहे. त्या मूल्याचे उल्लंघन झाल्यास, घटनेच्या चौकटीत, आरोपीला शिक्षा करता येते. म्हणूनच धर्मांतरविरोधी कायदे गैरलागू आहेत. धर्मांतरविरोधी कायद्यांमुळे मिशनऱ्यांना छळण्यासाठी एक हत्यार पोलिसांना व धर्मांध शक्तींना मिळालेले आहे.

मध्यप्रदेश आणि ओरिसा या राज्यांत धर्मांतरविरोधी कायदे अस्तित्वात आहेत आणि तिथे, आजपर्यंत, सक्तीने धर्मांतर झाले म्हणून कुणाला शिक्षा झालेली नाही. "सक्तीने धर्मांतरे होत नाहीत", याची ग्वाही पंतप्रधान अटलबिहारी वाजपेयी व स्वाध्याय परिवाराचे पूज्य पांडुरंगशास्त्री आठवले ह्यांनी दिलेली आहे.

६. धर्मपरिवर्तनाचा हक्क भारतीय घटनेने काही प्रचारकांना किंवा मिशनऱ्यांना दिलेला आहे, असे काहींना वाटते. ही त्यांची पूर्ण गैरसमजूत आहे. भारतीय घटनेने भारतीय नागरिकांना बहाल केलेला तो हक्क आहे. त्या हक्काचा संकोच करणे म्हणजे भारतीय नागरिकांना निवडीचे स्वातंत्र्य नाकारणे होय.

वास्तविक, भारतात ख्रिस्ती किंवा मुसलमान धर्म स्वीकारणाऱ्यांना अग्निदिव्याला सामोरे जावे लागते. या धर्माचा स्वीकार करणाऱ्यांना सर्व प्रकारच्या शासकीय सवलतींना मुकावे लागते.

७. भारतात हिंदू बहुसंख्य आहेत. त्यामुळे भारत हे 'हिंदू राष्ट्र' म्हणून घोषित केले जावे असे हिंदू धर्मातील काही मूठभर मूलतत्त्ववाद्यांना वाटते. 'त्यांचे सभासद वाढले म्हणजे आपले कमी होतात', असे त्यांना वाटते.

सुदैवाने, बहुसंख्य हिंदूंना तसे वाटत नाही. भारत हे अनेक धर्मांचे व संस्कृतींचे माहेरघर आहे. भारतीय संस्कृतीचे महावस्त्र अनेक धर्मांच्या धाग्यांनी विणलेले आहे. त्यातला एक जरी धागा उसवला तर संपूर्ण वस्त्राच्या चिंध्या होण्यास वेळ लागणार नाही ह्याची जाणीव सेक्युलर हिंदूंना आहे. जोपर्यंत ही जाणीव शाबूत आहे तोपर्यंत सर्वांचेच हितसंबंध सुरक्षित असतील. विविधतेने नटलेला खंडप्राय भारत देश अखंड राहण्यासाठी भारताच्या सेक्युलर स्वभावाला जपणे आवश्यक आहे. सेक्युलर हिंदूच अल्पसंख्य समाजाचे धर्मांध प्रवृत्तीपासून रक्षण करणार आहेत, ह्याची जाणीव अल्प-संख्यांकांनीही ठेवायला हवी.

८. कुठल्याही एका धर्माकडे राष्ट्रीयतेची मिरासदारी नाही. सर्वच धर्मांत व समाजांत राष्ट्रप्रेमी तसेच राष्ट्रद्रोही असतात. त्यामुळे कुठल्याही समाजगटाच्या हेतूविषयी शंका व्यक्त करणे योग्य नाही. त्यातूनच फॅसिस्ट प्रवृत्तींना खतपाणी घातले जाते.

इतिहासाची पाने चाळली तर काय लक्षात येते? शिवाजीच्या सैन्यात मुसलमान होते व औरंगजेबच्या पदरी हिंदू सरदार होते. इंग्रजांच्या काळात त्यांच्याकडे कारकुनी करण्याचे व त्यांचे राज्य अधिक भक्कम करण्याचे काम इथल्या उच्च वर्णाने म्हणजे शिकलेल्या ब्राह्मणांनी केले आहे. स्व. राजीव गांधींच्या कारकीर्दीत आपल्या देशातील गुपिते परदेशाला विकणारी एक टोळी उजेडात आली होती. त्या टोळीत अल्पसंख्य समाजातील एकही व्यक्ती नव्हती. म्हणूनच, राष्ट्रप्रेमाचा व भक्तीचा मक्ता एका समाजाकडे देणे गैर आहे. स्वतःला राष्ट्रभक्त म्हणणारे काहीजण भ्रष्टाचारात गळ्यापर्यंत रुतलेले दिसत आहेत! भ्रष्टाचार हा सर्वांत मोठा राष्ट्रद्रोह आहे.

९. ज्या मूलतत्त्ववाद्यांनी बाबरी मशीद उद्‌ध्वस्त केली तेच आता ख्रिस्ती धर्मस्थळांवर हल्ले करीत आहेत, मिशनऱ्यांना त्यांच्या कोवळ्या मुलांसह जिवंत जाळीत आहेत. या सर्वांमागे

अनुक्रमणिका

त्यांचा एक कुटील डाव आहे. भयग्रस्त झालेल्या अल्पसंख्य समाजाने अधिक कट्टर व आक्रमक व्हावे, असे त्यांना मनोमन वाटत आहे. एकदा मूठभर अल्पसंख्य आक्रमक बनले म्हणजे मग 'हिंदुत्वा'च्या निशाणाखाली सर्व हिंदूंना एकत्र करणे त्यांना सोपे व सुलभ जाणार आहे. हा धोका अल्पसंख्य समाजाने वेळीच ओळखला पाहिजे.

'सर्व अल्पसंख्य लोकांनी एकत्र यावे,' असाही विचार मांडला जाईल. त्यामध्येसुद्धा धोका आहे. तशी जुळणी व्हावी हे कट्टर हिंदुत्ववाद्यांच्या पथ्यावर पडण्यासारखे आहे. एकदा सर्व अल्पसंख्य एका व्यासपीठावर आले म्हणजे 'अल्पसंख्य विरुद्ध बहुसंख्य' अशी जुळणी करणे त्यांना सोपे जाणार आहे.

१०. मग अल्पसंख्यांकांनी काय करावे? मूग गिळून गप्प बसावे का? मुकाट्याने अन्याय सहन करावा का? आपल्या अस्मितेवर होणारे हल्ले पाहून केवळ अश्रू गाळावेत का?

प्रथमतः त्यांनी आत्मपरीक्षण करावे. बहुसंख्य समाजाच्या आणि कुठल्याही समाजाच्या विशुद्ध भावना दुखावतील असे वर्तन करू नये. जुन्या काळात चुका झालेल्या असतील तर त्या पदरी घेऊन, त्यांची पुनरुक्ती होणार नाही याची काळजी घ्यावी.

आपल्याकडे सत्य आहे अशी खात्री असली तरी सत्य सौजन्याने आणि प्रेमाने सांगायचे असते. त्याबाबत आक्रमक होण्याची गरज नाही. प्रभू ख्रिस्त संख्या वाढविण्यासाठी नव्हे, तर जीवन देण्यासाठी आला होता. "तुम्ही जिथे जाल तिथं शांती प्रस्थापित करा, कुणी तुमचं स्वागत केलं नाही तर नम्रपणे व निमूटपणे दुसऱ्या गावात जा," हा ख्रिस्ताचा संदेश प्रचारकांनी नेहमी ध्यानात ठेवावा.

कुठल्याही क्षेत्रातील मूलतत्त्ववाद विखारी असतो. मूळ ख्रिस्ती धर्माला न मानणारे मूठभर अतीउत्साही लोक समाजात फिरताना आढळतात. आपला उत्साह विवेकावर मात करणार नाही ह्याची काळजी त्यांनी घेणे जरुरीचे आहे.

जे आपल्याला पटलेले आहे हे इतरांना सांगण्याचे स्वातंत्र्य जसे हरेकृष्ण चळवळीतील लोकांना आहे, तसे ते अन्य धर्मांतील नागरिकांनाही आहे. गीतेचे वाटप केले जाते, तसेच बायबल, कुराण, धम्मपद यांचे वितरण झाले तर 'आमचा धर्म बुडविला' अशी हाळी देऊन, कुठल्याही धर्माचा ग्रंथ जाळणे ही कळसाची असहिष्णुता आहे हे ध्यानात ठेवावे.

११. आरोग्यसेवा आणि शिक्षणदान याबाबतीत ख्रिस्ती चर्च देशात आघाडीवर आहे. राष्ट्रीय प्रवाहात हा समाज समरस झालेला आहे. तरीदेखील ख्रिस्ती माणसाने चर्चच्या आवारातून बाहेर पडून, सामाजिक, साहित्यिक, सांस्कृतिक आणि राजकीय क्षेत्रांत अधिक सक्रीय होण्याची गरज आहे.

देशबांधणीचे कार्य देशात चालू आहे. ख्रिस्ती चर्चतर्फे वैद्यकीय आणि शिक्षण क्षेत्रात फार मोठे कार्य केले जाते. गोरगरीब भारतीयांची निष्ठेने सेवा केली जाते. या कार्यात आपल्याला स्पर्धक म्हणून उतरायचे नाही, तर सहकारी म्हणून सहभागी झाले पाहिजे. एकत्र कार्य केल्यामुळे संशयाच्या भिंती आपोआप कोसळून पडतात व परस्परांविषयी वाटणारी सुप्त भीतीही नाहीशी होती.

राजकारण हे महत्त्वाचे क्षेत्र आहे. विधीशून्य अशा काही राजकारण्यांनी ते क्षेत्र बदनाम केले असते, तरी समाजाचा गाडा चालविण्यासाठी राजकारणात प्रवेश करणे महत्त्वाचे आहे.

राजकारण हा नेहमीच मवाल्यांचा अड्डा असतो असे नाही. स्व. शास्त्रीजी, ह.भ.प. बाळासाहेब भारदे, श्री. पूर्णो संगमा ह्यांच्यासारखी चारित्र्यवान माणसे राजकारणात असल्यामुळे राजकारणाची गुणवत्ता वाढलेली आहे. यासाठी ख्रिस्ती लोकांनी राजकारणामध्ये सहभाग घेणे आवश्यक आहे.

### धर्मांतर-विरोधाची कारणे

१२. 'जात नाही ती जात', असे जातिव्यवस्थेचे वर्णन केले जाते. वर्णव्यवस्था हा आपल्या समाजजीवनावरील एक कलंक आहे. तो पुसण्याचा ज्यांनी ज्यांनी प्रयत्न केला त्या सर्वांना वर्णवर्चस्ववाद्यांकडून विरोध होत आलेला आहे. विषम सामाजिक व्यवस्थेचे जे लाभार्थी आहेत त्यांनी समतेच्या विचारांचे स्वागत केलेले नाही. उलट समतेचा विचार गाडून टाकण्याचा प्रयत्न केला आहे.

ख्रिस्ती धर्मात काही अंतर्विरोध असले व समतेचा विचार शंभर टक्के भारतीय ख्रिस्ती समाजाच्या अंगी भिनला नाही हे गृहीत धरले तरी ख्रिस्ती धर्म मूलतः समतावादी आहे. या धर्माचा स्वीकार केल्यावर, जातीचे व्रण राहिले, तरी जातीच्या खपल्या पूर्णपणे गळून पडतात.

विषमतावादाचा, वर्णवर्चस्वाचा पुरस्कार करणाऱ्या शक्ती समतावादी विचाराचा स्वीकार करू शकत नाहीत. समताधिष्ठित

ख्रिस्ती धर्माला होणाऱ्या विरोधामागील हे एक मुख्य कारण आहे.

१३. सहिष्णुता किंवा परमताचा आदर हे आपल्या भारतीय संस्कृतीचे एक वैशिष्ट्य आहे. दुसऱ्यांचा त्यांच्या वेगळेपणासह स्वीकार करणे, ही खरी सहिष्णुता आहे. मनाची विशालता सहिष्णुता आहे. मनाची विशालता असल्याशिवाय अशा प्रकारे परमताचा आदर करणे शक्य नसते. त्यासाठी निराळ्या मताचा सांगोपांग अभ्यास करावा लागतो. 'निराळेपण' आत्मीयतेने समजून घ्यावे लागते. कधी आपल्या मताचे कंगोरे घासूनपुसून घ्यावे लागतात.

'मी बरा आहे, तू बरा आहेस' असा भोंगळपणा म्हणजे सहिष्णुता नाही. ती केवळ उदासीनता असू शकते. परमताविषयी कुणी जराशी शंका काढली की उदासीन वृत्तीची माणसे अस्वस्थ होतात. त्यांचा पाया ठिसूळ होतो. ती डळमळीत होतात.

आपल्या देशात काही लोक पराकोटीचे असहिष्णू आहेत. विचारवंत त्यांना मनुवादी किंवा गोडसेवादी म्हणतात. आपले तेच खरे ही त्यांची भूमिका असते. प्रत्येक परधर्म त्यांना भयावह वाटतो. ज्याची भीती वाटते त्याचे निर्दालन करणे ही त्यांची प्रवृत्ती असते. सर्व प्रकारची भीती असुरक्षिततेच्या भावनेतूनच जन्माला येते हे इथे लक्षात ठेवणे आवश्यक आहे.

ख्रिस्ती धर्म अस्सल भारतीय आहे. परंतु, मनुवादी प्रवृत्तीच्या लोकांच्या अबोध मनात ख्रिस्ती धर्माविषयी पराकोटीचा संशय आहे. त्यांच्यापैकी काहींनी बिगरीपासून डिग्रीपर्यंत शिक्षण ख्रिस्ती शिक्षणसंस्थांत घेतलेले असते. परंतु मिशनऱ्यांविषयी त्यांच्या मनात कायम अढी असते, ही वेदनादायक गोष्ट आहे.

जे एके काळी आपले होते, ते आता निराळे झाले हे शल्य त्यांना बोचत असावे. इथेच त्यांच्या सहिष्णुतेची खरी कसोटी असते. दुसऱ्यांना त्यांच्या निराळेपणासह स्वीकारणे ही खरी सहिष्णुता असते. अमेरिकेत आज सर्व धर्मांचे लोक वास करतात. परंतु तिथं कुणी धर्माच्या नावाने वाद उकरून काढीत नाहीत. तिथल्या लोकांना हिंदूंची वाढती संख्या पाहून भय वाटत नाही.

भय आणि असुरक्षितता या कैचीत सापडल्यामुळे काल्पनिक शत्रूंना नष्ट करणे हाच एक त्यांना उपाय वाटतो. असहिष्णुतेला जागतिक वारसा आहे. सॉक्रेटिसला विषाचा पेला प्राशन करावा लागला. ख्रिस्ताला सुळावर जावे लागले. जोन ऑफ आर्कला जिवंत जाळण्यात आले. मनुवाद्यांनी तुकाराम, ज्ञानेश्वर यांचा छळ केला. युरोपमध्ये लोकांनी 'इन्क्विझिशन' चालवून अनेकांना छळले. अमेरिकेत निग्रोंना हक्क नाकारणारे व भारतात मंडल शिफारशींना विरोध करून आगडोंब उठविणारे हे एकाच माळेचे मणी आहेत. अमेरिकेने निग्रोंना हक्क बहाल केले आहेत व रेड इंडियन्ससाठी अजूनही 'राखीव जागा' ठेवलेल्या आहेत.

स्वातंत्र्याच्या उषःकाळी महात्मा गांधींनी भारत-पाकिस्तान समस्येवर सुचविलेला उपाय काहींना रुचला नाही. तेव्हा विचाराने विचाराबरोबर लढाई करण्याऐवजी गांधीजींची हत्या करण्यात आली. आणि आपण वैचारिक दृष्ट्या पराभूत झालो आहोत हे सिद्ध केले. हीच मंडळी आज अतिशय सूत्रबद्धपणे ख्रिस्ती समाजाविरुद्ध रान उठवीत आहेत. जितक्या कुशलतेने त्यांनी गांधीजींच्या हत्येची आखणी केली त्यापेक्षा अधिक कुशलतेने ते आज मिशनऱ्यांविरुद्ध मोहीम राबवीत आहेत.

बहुसंख्य हिंदू समाज सुजाण असल्यामुळे अपप्रचाराचा त्याच्यावर फारसा परिणाम होत नाही. परंतु, धर्मांतराविरुद्ध रान उठविण्यात गोडसेवादी काही प्रमाणात यशस्वी झाले आहेत. "ज्याअर्थी ते ख्रिस्ती लोकांवर इतके आरोप करतात, त्याअर्थी त्यात काही सत्यांश असला पाहिजे," असे विचार, एरवी समंजस वाटणारे लोकही करू लागले आहेत. संशयाचे धुके निर्माण केले म्हणजे संहाराचा कार्यक्रम सुरळीतपणे पार पाडता येतो. समाजात भरपूर धुके व काही धूर निर्माण करण्यात गोडसेवादी यशस्वी झालेले दिसतात.

१४. वास्तविक, मनुवादी प्रवृत्तीचा मूलभूत स्वातंत्र्याला विरोध आहे. स्त्री-शूद्रांना त्यांनी स्वातंत्र्य नाकारले आहेच, परंतु एकूण स्वातंत्र्य (liberty) व मानवी हक्क (Human Rights) ह्या गोष्टी त्यांनी खुल्या मनाने स्वीकारलेल्या आहेत का? हा खरा प्रश्न आहे.

स्वातंत्र्य, समता आणि विश्वबंधुत्व ही त्रिसूत्री फ्रेंच राज्यक्रांतीतून (आणि पर्यायाने *नवीन करारा*तून) झिरपत आलेली असल्यामुळे म्हणजे ही मूल्ये 'परदेशी' वाटल्यामुळे जीर्णमतवाद्यांना ती स्वीकारार्ह वाटत नसावी का?

१५. शीख, बौद्ध व जैन हे धर्म वैदिक धर्माशी भांडून निराळे झालेले 'भारतीय प्रॉटेस्टंट' धर्म आहेत. विपमतावाद्यांना त्यांचेही निराळे अस्तित्व मान्य नाही. परंतु, एकाच वेळेला

अनेक शत्रू नकोत, असा व्यवहारी विचार करून ते या धर्मांना हिंदू धर्माच्या शाखा म्हणून समजतात. अर्थात्, वरील तिन्ही धर्मांचे लोक तसे स्वतःला समजतात का? हा वादाचा प्रश्न आहे. म्हणून, 'मी हिंदू म्हणून जन्माला आलो असलो तरी मी हिंदू म्हणून मरणार नाही,' अशी भीमप्रतिज्ञा डॉ. बाबासाहेब आंबडेकरांनी केली व १९५६ साली आपल्या हजारो हिंदू बांधवांना घेऊन त्यांनी बौद्ध धर्माची दीक्षा घेतली.

या देशात आदिवासी आहेत याची जाणीव मनुवाद्यांना नव्हती. गुराढोरांच्यापेक्षा हलाखीचे जीवन त्यांना जगावे लागत आहे ह्याची त्यांनी कधी पर्वा केली नाही. परंतु, आता मात्र त्यांना आदिवासी आपले वाटू लागले आहेत. आदिवासी आत्मापूजक (ॲनिमिस्ट) आहेत. आदिवासी हिंदू नाहीत, तसे ते ख्रिस्तीही नाहीत हे खरे आहे. परंतु त्यांना आपल्या आवडीचा उपासना-मार्ग निवडीचे स्वातंत्र्य आहे.

धर्मबदल हे अंतिम मूल्य नाही. धर्म म्हणजे एक जीवनदृष्टी असते. प्रत्येक धर्माची एक विशिष्ट तात्त्विक बैठक व व्यवहारी नीती असते. एक प्रेषित, एक धर्मग्रंथ आणि एकमेव ईश्वर ही सेमिटिक म्हणजे यहुदी, ख्रिस्ती व इस्लाम या धर्मांची वैशिष्ट्ये आहेत. हिंदू धर्मात तसे नाही. तिथे वरील धर्मांप्रमाणे बंदिस्त धर्मसिद्धांत नाही. खूप मोकळेपणा आहे. बौद्ध धर्म खूप अज्ञेयवादी आहे. बहाई समन्वय आहे.

आता, ज्याला जो मार्ग आवडेल तो स्वीकारण्याचे, निवड करण्याचे स्वातंत्र्य एखाद्याला आपण देणार की नाकारणार? मनुवादी तसे स्वातंत्र्य देत नाहीत. त्यामुळे ते धर्मांतरबंदीचा आग्रह धरतात.

प्रसिद्ध मराठी लेखक श्री. वि.द. घाटे ह्यांनी या प्रवृत्तीवर बरोबर बोट ठेवले आहे. 'धर्मांतर' या आपल्या लेखात ते म्हणतात, "सिस्टर निवेदिता एक ख्रिस्ती बाई. फार भली. हिंदू झाली. आम्हाला आनंद झाला. अभिमान वाटला. छाती फुगून आली. बाईंनी योग्य केले असेच आम्ही म्हणालो. निवेदितांच्या पूर्वी, पंडिता रमाबाई हिंदू होत्या, त्या ख्रिस्ती झाल्या. आमची डोकी भडकली. आम्हांला ते दुश्चिन्ह वाटले. एवढी मोठी शहाणी बाई, संस्कृत भाषेत अस्खलित बोलणारी, भूतदयेने प्रेरित झालेली, बाणेदार, तेजस्वी. अशा बाईने ख्रिस्ती व्हायला नको होते असेच आम्हांला वाटले. या धर्मांतराला आता कितीतरी वर्षे झाली. परंतु आपल्या मनात अद्याप ते सलत आहे.... मनात रुखरुख असतेच. सिस्टर निवेदितांना धर्म बदलण्याचा अधिकार होता, रमाबाईंना मात्र तो नव्हता, असे आम्हांला वाटते. एकीबद्दल एक न्याय, दुसरीबद्दल दुसरा!" (*विचार विलसिते* - वि.द. घाटे)

पंडिता रमाबाई अस्सल भारतीय होत्या. दुर्दैवी भारतीय भगिनींसाठी त्यांनी चळवळ उभारली. रेव्ह. ना.वा. टिळक, बाबा पदमनजी हे मराठी भाषेचे थोर सेवक आहेत. या सर्वांनी पूर्ण विचाराने ख्रिस्ती धर्माचा स्विकार केला. तरीदेखील, 'ह्या मंडळीने ख्रिस्ती धर्म स्वीकारला नसता तर बरे झाले असते', असे काहींना अजूनही वाटते. त्यांना असे का वाटावे? असा प्रश्न मनाला पडतो.

१६. ख्रिस्ती धर्मामुळे अलगतावाद पोसला जातो; नागालँड, मिझोराम ही त्याची उदाहरणे आहेत, असा आरोप अनेकदा केला जातो.

वास्तविक धर्म हा उपासनामार्ग आहे. ती एक आध्यात्मिक वाट आहे. त्यामुळे धर्माच्या नावे अलगतावाद कुणी जोपासीत असेल तर त्या प्रवृत्तीला भारतीय दंड विधानाच्या चौकटीनुसार योग्य ते शासन झाले पाहिजे.

अनेकदा सामाजिक समस्यांचा संबंध धर्मापेक्षा 'अर्था'शी असतो. आपला विकास झालेला नाही किंवा आपल्यावर दुर्लक्ष होत आहे, अशी काही समाजगटांची समजूत होते. अशांचा धर्म कोणता आहे हे शोधण्याऐवजी, त्यांचे दुखणे काय आहे याकडे लक्ष देणे अधिक महत्वाचे आहे. उदा. पंजाबमध्ये खलिस्तानची भाषा ऐकू येते. आसाममध्ये बोडोंचे आंदोलन सुरू आहे, अगदी महाराष्ट्रात वेगळ्या विदर्भ राज्याचा विचार मांडला जातो. ही मंडळी फुटीर आहेत का? त्यांना भारतापासून अलग व्हायचे आहे का? मुळीच नाही.

धर्म हा उपासनामार्ग आहे, असे आधी सांगितले आहे. ख्रिस्ती धर्महो उपासना मार्ग आहे. परंतु, या धर्माच्या काही धारणा आहेत. त्यांच्यासाठी धर्म देव्हाऱ्यापुरता मर्यादित नाही. जो धर्म फक्त देव्हाऱ्यापुरता असतो त्याचे रूपांतर अफूच्या गोळीत व्हायला जास्त वेळ लागत नाही.

सेवा हा ख्रिस्ती श्रद्धेचा अविभाज्य भाग आहे. मानवाची व विशेषतः दीनदुबळ्यांची सेवा केल्याशिवाय धर्माचे पालन पूर्णपणे होऊ शकत नाही. त्या भूमिकेतून ख्रिस्ती धर्मातर्फे जगभर सेवाकार्य चालते.

शिक्षणदान हा सेवेचा एक उत्तम प्रकार आहे. चातुर्वर्ण्याच्या चौकटीत जे तळाला होते त्यांना उच्चवर्णियांनी पायदळीच



अनुक्रमणिका

तुडविले, त्यांना शिक्षणापासून वंचित ठेवले. तसे करणे त्यांना आवश्यक वाटले कारण दलित, आदिवासी आणि वन्य जातीजमाती यांना शिकवून शहाणे केले तर वर्णधर्माची इमारत जमीनदोस्त होऊन समाजात एकच वर्ग तयार होईल, अशी भीती काहींना वाटते.

मिशनऱ्यांनी शिक्षणदानावर भर दिला. शेकडो वर्षे जे अज्ञानात खितपत पडले होते त्यांना त्यांनी लिहायला, वाचायला शिकविले. साक्षर झाल्यामुळे या समूहगटाची अस्मिता जागृत झाली. त्यांना आपल्या हक्कांची जाणीव झाली. म्हणूनच 'शिका, संघटित व्हा, संघर्ष करा,' असा मंत्र बाबासाहेब आंबेडकरांनी आपल्या अनुयायांना दिला.

शिकलेले लोक आपल्या हक्कांसाठी संघटित होतात आणि संघर्ष करतात. मिशनऱ्यांनी ज्या दलित, पीडित आणि वन्य जातीजमाती यांना शिकविले, ते जर आपल्या न्याय्य हक्कांसाठी संघर्ष करू लागले तर त्यांना दोष का द्यावा?

'साक्षरतेशिवाय भारताला तरणोपाय नाही' असा सुवर्णमंत्र नोबेल पारितोषिक विजेते अमर्त्य सेन ह्यांनी दिला आहे. अमर्त्य सेनच्या साक्षरता अभियानाला विश्व हिंदू परिषदेचे श्री. अशोक सिंघल ह्यांनी कडाडून विरोध का केला हे आपल्या लक्षात येऊ शकेल.

१७. शेवटी, ख्रिस्ती धर्मियांवर गेल्या पन्नास वर्षांत अनेक हल्ले झालेले आहेत. दर वर्षी दसऱ्याला सरसंघसंचालक नागपूरहून ख्रिस्ती आणि मुसलमान धर्मांवर आगपाखड करीत असतात. परंतु, १९९८ मध्ये मात्र अगदी मोजून, मापून मिशनऱ्यांवर हल्ले करण्यात आले. ह्याचे कारण काय? एखाददुसऱ्या ठिकाणी गैरसमजातून संघर्ष होऊ शकतात, परंतु देशभर असे प्रकार कसे काय होतात? हा मोठा प्रश्न आहे.

गरिबी, भाववाढ, बेकारी या मूलभूत व अडचणीच्या प्रश्नांवरून लोकांचे लक्ष अन्यत्र वेधण्यासाठी आखलेले हे कारस्थान असावे का?





अनुक्रमणिका








# फादर दिब्रिटो यांच्या काही युक्तिवादांविषयी

**मे.पुं. रेगे**

गेल्या दोन वर्षांत ख्रिस्ती धर्मगुरू आणि जोगिणी, आणि विशेषतः धर्मप्रसारक (मिशनरी) ह्यांच्यावर देशाच्या अनेक भागांत संघटित रीतीने हिंस्र हल्ले होत आहेत. 'संघ-परिवारा'तील हिंदू जागरण मंच, बजरंग दल इ. विशेष आक्रमक संघटना ह्या निषेधार्ह घटनांच्या पाठीमागे आहेत ह्यात संशय नाही. ह्या दुष्कृत्यांच्या संपूर्ण पाढा येथे घेण्याचे कारण नाही. पण विशेष काही घडत नाही आहे अशी सामाजिक वृत्ती बनू नये म्हणून त्यांचा थोडक्यात आढावा येथे घेणे योग्य ठरेल. गुजरातमध्ये, जेथे भारतीय जनता पक्षाचे सरकार आहे तेथे अशा बऱ्याच घटना घडल्या आहेत. अखिल भारतीय कॅथलिक युनियनने गुजरातच्या विविध भागांत घडलेल्या ख्रिस्तीविरोधी ३३ घटनांची यादी प्रसिद्ध केली आहे. (ऑगस्ट १९९८). अगोदरच्या सहा महिन्यांत घडलेल्या ह्या घटना होत्या. त्यांतील विशेष भयानक घटना अशी की, कापडवंज (नडियाद जिल्हा) येथील दफनभूमीतून सॅम्युएल ख्रिश्चन यांचे प्रेत उकरून काढण्यात आले आणि ते मेथॉडिस्ट चर्चसमोर फेकून देण्यात आले. (जुलै ८, ९८). त्यापूर्वी २० जूनला राजकोट येथे मुलींच्या एका ख्रिस्ती शाळेवर हल्ला करण्यात आला — ही शाळा १०० वर्षांची जुनी आहे — आणि 'जय राम'च्या घोषणा देत मुलींच्या हातातून *नव्या करारा*च्या प्रती हिसकावून घेऊन जाळण्यात आल्या. सुमारे तीनशे प्रती जाळण्यात आल्या. २५ डिसेंबर ते ३ जानेवारी ह्या दरम्यान डांगच्या प्रदेशात २४ चर्च, ३ ख्रिस्ती शाळा आणि ६ घरे-दुकाने जाळण्यात आली – ह्या इमारती नष्ट झाल्या किंवा त्यांचे बरेच नुकसान झाले; ९ ख्रिस्ती आदिवासी गंभीर रीत्या जखमी झाले. झाबुआ, मध्यप्रदेश येथे चार ख्रिस्ती जोगिणींवर बलात्कार करण्यात आले. (सप्टेंबर २३, १९९८). हे सर्व हिंदू धर्माचे संरक्षण करण्यासाठी, त्याच्यावर होणाऱ्या आक्रमणाचा प्रतिकार करण्यासाठी म्हणून झाले. ह्या सर्वांवर कडी म्हणजे डॉ. ग्रॅहम स्टेन्स आणि त्यांचे दोन मुलगे यांना मनोहरपूर, ओरिसा येथे गेल्या जानेवारीत जिवंत जाळण्यात आले. हे अघोरी कृत्य करणारेही 'जय श्रीराम'च्या घोषणा देत होते. डॉ. स्टेन्स हे ऑस्ट्रेलिअन होते. महारोग्यांची सेवा करण्यासाठी आपला देश सोडून ते ओरिसातील आदिवासी विभागात रहायला आले होते. गेली चौतीस वर्षे त्या भागात ते कार्यरत होते. ह्या सेवेच्या मोबदल्यात ते धर्मांतर घडवून आणत होते असे मानायला काही आधारही नाही. त्यांच्या आश्रमात जे व्याधिग्रस्त रहात होते त्यांतील बहुसंख्य हिंदूच होते.

ह्या भीषण कृत्याने देश हादरून गेला. ख्रिस्ती मिशनरी गरीब असहाय हिंदूंचे धर्मांतर घडवून आणतात ह्याची चीड असलेले आणि ह्यामुळे त्यांना जे कुणी धडा शिकवीत असतील त्यांच्याविषयी मनातून सहानुभूती असलेले हिंदूही ह्या पाशवी कृत्याने हबकून गेले असणार. अंगावर शहारे आणणाऱ्या ह्या घटनेने सर्वच जण काही काळ तरी भानावर आले असणार. आपण कुठे चाललो आहो? "धर्मो रक्षति रक्षितः". आपण– किंवा आपल्यासाठी (दुसरा कुणी) — कोणत्या धर्माचे रक्षण करू पहातो आहोत? दोन निष्पाप मुलांना जिवंत जाळणे! डॉ. स्टेन्सच्या परिचयाचे लोक सांगतात की ते नेहमी आनंदी, हसरे असायचे. येशूचा आदर्श त्यांनी मनोमन स्वीकारला आणि तो जन्मभर पाळला. येशूसारखे त्यांना स्वतःचे बलिदान करावे लागले. असा हा माणूस केलेल्या सेवेचा मोबदला मागेल? आणि कुणी दिला तर स्वीकारेल? आणि स्टेन्सच्या व्यक्तिमत्त्वाला, 'जीवनसरणीला प्रतिसाद म्हणून एखादा हिंदू किंवा हजारो हिंदू त्याचे अनुयायी झाले, 'ख्रिस्ती' झाले तर त्याचे वैषम्य कुणाला कां वाटावे?

त्यांच्या पत्नीने ह्या प्रसंगी जे धीरोदात्त वर्तन केले त्याला तोड नाही. आपल्या पतीच्या आणि मुलांच्या मारेकऱ्यांना त्यांनी क्षमा केली – "बापा, त्यांना क्षमा कर, आपण काय करीत आहोत हे त्यांना कळत नाही." आणि आपल्या पतीचे काम, जीवनभरच्या त्याच्या कार्यक्षेत्रात पुढे चालू ठेवण्याचा निर्धार व्यक्त केला. प्रेम, श्रद्धा, आशा आणि 'चॅरिटी' हे ख्रिस्ती सद्गुण आहेत — but above all charity! 'चॅरिटी'चे भाषांतर कसे करणार? ती सर्व काही सहन करते, ती माणसाच्या चांगुलपणावर नेहमी विश्वास ठेवते, ती कधी








अनुक्रमणिका

आशा सोडीत नाही आणि ती सर्व अपकृत्यांची क्षमा करते. वुद्धाची मैत्री, करुणा आणि उपेक्षा ह्यांचा संगम 'चॅरिटी'त होतो. उपेक्षा म्हणजे 'जो खांडावयाला घात घाली। की लावणी जयाने केली। दोघां एकची सावली। वृक्ष दे जैसा।।' ही वृत्ती. जो खरा हिंदू आहे, म्हणजे जो धर्माने हिंदू आहे, त्याला ही माणसे परकी वाटणारच नाहीत. ती आमची सोयरी आहेत.

भारतीय राज्यघटनेने प्रत्येक नागरिकाला धार्मिक स्वातंत्र्याचा अधिकार मूलभूत हक्क म्हणून बहाल केला आहे आणि ह्या हक्कात धर्मप्रसाराचा हक्कही स्पष्टपणे नमूद करण्यात आला आहे हा तर महत्त्वाचा मुद्दा आहेच. प्रत्येक नागरिकाला आपले मूलभूत हक्क सुरक्षितपणे वजावता येतील अशी परिस्थिती निर्माण करणे आणि टिकवून धरणे हे भारत सरकारचे आणि राज्य सरकारांचे आद्य कर्तव्य आहे. पण यापुढे जाऊन असेही म्हणणे आवश्यक आहे की, भारतीय समाजातील प्रत्येक धार्मिक जमातीला आपल्याला येथे आपुलकीने, सन्मानाने वागविण्यात येत आहे असा अनुभव आला पाहिजे. अशी परिस्थिती निर्माण करणे ही हिंदू समाजातील सुशिक्षित वर्गाची जवावदारी आहे. कारण आज भारतीय समाजाचे सामाजिक धुरीणत्व त्याच्या हातात आहे.

आणि ही खरी हिंदू धार्मिक परंपराही आहे. प्रत्येक धर्माची उपासना पद्धती असते. काही विधी असतात. सण-समारंभ असतात. पण त्याचा आत्मा ह्या कोषाच्या पलीकडे असतो.

"सर्व धर्मान् परित्यज्य माम् एकं शरणं व्रज।" त्या ठिकाणी मग हिंदू नसतो, बौद्ध नसतो, मुसलमान नसतो, ख्रिस्ती नसतो; केवळ ईश्वरनिष्ठांची मांदियाळी असते. ह्या ईश्वराचीही अनेक रूपे असतात. निर्वाण, ब्रह्म, आकलनाच्या पलीकडे असलेली शांती! ह्या धार्मिकतेचा स्पर्श ज्याच्या अंतःकरणाला झालेला असतो त्याला कुणी परका नसतो. ही हिंदू वृत्ती जागृत व सक्रिय करणे हे हिंदू धार्मिक नेत्यांचे आजचे निकडीचे कर्तव्य आहे.

– १ –

'धर्मांतर – काही मूलभूत प्रश्न' ह्या शीर्षकाचे फा. फ्रॅन्सिस दिब्रिटो यांचे टिपण वाचल्यावर मनावर जो पहिला ठसा उमटतो तो असा की हे वकिली पद्धतीने लिहिलेले टिपण आहे. आपल्या पक्षाचा बचाव करताना, त्याच्या विरुद्ध जाणारा पुरावा वकिलाला माहीत असला तरी तो पुरावा तो स्वतः होऊन पुढे आणीत नाही; इतकेच नव्हे तर झाकण्याचा प्रयत्न करतो. अनेक गोष्टी, ज्या सत्य नाहीत हे त्याला माहीत असते त्या, ज्यूरीचे मत अनुकूल करून घेण्यासाठी, तो सूचित करीत असतो. प्रतिकूल पुरावा झाकण्याचे एक उदाहरण पहा. "असहिष्णुतेला जागतिक वारसा आहे.... जोन ऑफ आर्कला जिवंत जाळण्यात आले. मनुवाद्यांनी तुकाराम, ज्ञानेश्वर यांचा छळ केला. युरोपमध्ये लोकांनी 'इन्क्विझिशन' चालवून अनेकांना छळले..." (पृ. ९; पृष्ठ क्रमांक *नवभारत*चा याच ऑगस्ट'९९च्या अंकातले आहेत.) 'जोन ऑफ आर्कला जिवंत जाळण्यात आले' हे वाक्य कर्मणी प्रयोगात आहे. कर्ता कोण, जोनला कुणी जाळले हे त्याच्यात निर्दिष्ट केलेले नाही. पुढचे वाक्य कर्तरी प्रयोगात आहे. 'मनुवाद्यांनी तुकाराम, ज्ञानेश्वर यांचा छळ केला'. तुकाराम, ज्ञानेश्वर यांचा छळ कुणी केला हे ह्या वाक्यात स्पष्ट होते. तो मनुवाद्यांनी केला. जोन ऑफ् आर्कला कुणी जिवंत जाळले? ह्याचे उत्तर *नवभारता*च्या वाचकांना माहीत असणार. तरी येथे देतो. रोमन कॅथलिक चर्चच्या अधिकृत न्यायसभेने तिला पाखंडी म्हणून दोषी धरले आणि जिवंत जाळले. पुढचे वाक्य अधिक मजेदार आहे. त्याच्यात असे सांगितले आहे की *लोकांनी* (तिरपा ठसा माझा) इन्क्विझिशन चालवून अनेकांचा छळ केला. आता, इन्क्विझिशन ही कॅथलिक चर्चची अधिकृत यंत्रणा होती. पोप नववा ग्रेगरी ह्यांनी इ.स. १२३१ मध्ये पाखंडी लोकांना हुडकून त्यांच्यावर खटले भरण्यासाठी पेपल (पोपप्रणीत) इन्क्विझिशनची स्थापना केली. १४७८ मध्ये पोप (चवथा) सिक्स्टस यांनी स्पॅनिश इन्क्विझिशनला अधिकृतपणे मान्यता दिली. टॉमस डी टॉर्किमाडा हा डोमिनिकन पहिला 'ग्रँड इन्क्विझिटर' होता. त्याच्या तावडीत सापडलेल्या संशयितांचा शारीरिक छळ (torture) करण्यासाठी तो प्रसिद्ध होता. त्याने निदान २००० लोकांना जिवंत जाळले. पोप पाचवे पायस ह्यांनी पाखंड (heresy) आणि असत्य व चुकीची धर्ममते ह्यांचा बिमोड करणे हे आपले कर्तव्य राहील असे जाहीर केले आणि इन्क्विझिशनच्या अनेक कार्यक्रमांत स्वतः भाग घेतला. इन्क्विझिशन ऑटो-दा-फे (auto-da-fe -- act of faith) समारंभपूर्वक साजरी करीत असे; हा धार्मिक समारंभ होता. पाखंडी किंवा मुसलमान किंवा प्रॉटेस्टंट हे दोषी धरले जात. आजन्म कैद व मालमत्ता जप्त करणे ह्या सर्वांत कठोर शिक्षा

सर्वात कठोर शिक्षा होत्या. पण देहान्ताचीही शिक्षा होत असे. मात्र ही शिक्षा चर्च अंमलात आणीत नसे. अपराधी व्यक्तीला ठार मारण्याचे काम सरकारी अधिकारी करीत. १९०८ मध्ये पोप दहावे पायस ह्यांनी, 'इन्क्विझिशन' हा शब्द गाळला आणि श्रद्धेची शुद्धता राखण्यासाठी 'पवित्र कार्यालय' (Holy Office) सुरू केले. इतिहासात 'लोकांनी' अनेक गुन्हे केले आहेत पण इन्क्विझिशन संघटित करण्याचा गुन्हा त्यांनी केलेला नाही. हा गुन्हा असेल तर तो चर्चने केलेला आहे. गोव्यात इन्क्विझिशनने जो हाहाकार माजविला त्याचे तरी स्मरण दिव्रिटो यांना असायला हवे होते.

वर जी दिव्रिटो यांची वाक्ये उद्धृत केली आहेत त्यात 'मनुवाद' असा शब्द आहे. आतापर्यंत 'मनुवाद' हा शब्द राजकीय विवादात नालस्तीचा शब्द म्हणून वापरण्यात येत होता. गंभीर राजकीय, सामाजिक, धार्मिक विवेचनात हा शब्द वापरल्याचे मी पाहिले नव्हते. 'मनुवादा'चा त्यांनी लावलेला अर्थ त्यांनीच स्पष्ट केला आहे. ते म्हणतात, "आपल्या देशात काही लोक पराकोटीचे असहिष्णू आहेत. विचारवंत त्यांना मनुवादी किंवा गोडसेवादी म्हणतात." (पृ. ९. शुद्धलेखन सुधारलेले) दिव्रिटो हे स्वतः ह्या विचारवंतांचे अनुयायी दिसतात. कारण त्यांनी स्वतः हा शब्द सातत्याने वापरला आहे. एकदा वर उद्धृत केलेल्या वाक्यात, एकदा "या देशात आदिवासी आहेत याची जाणीव मनुवाद्यांना नव्हती," या वाक्यात (पृ. १०) आणि इतरत्र. आता हे विचारवंत कोण की जे पराकोटीच्या असहिष्णू व्यक्तींना मनुवादी किंवा गोडसेवादी म्हणतात? ही गोष्ट दिव्रिटो स्पष्ट करीत नाहीत. पण, समजा, एखादा मुसलमान किंवा ख्रिस्ती माणूस पराकोटीचा असहिष्णू असला तर त्याला हे विचारवंत मनुवादी किंवा गोडसेवादी म्हणणार काय? आता असे म्हणता येईल की, हा प्रश्न उद्भवत नाही, कारण या देशातील एकूणएक मुसलमान आणि एकूणएक ख्रिस्ती हे सहिष्णू असतात; किंवहुना, पराकोटीचे सहिष्णू असतात. असहिष्णू असतात ते फक्त हिंदू; त्यांच्यातील जे पराकोटीचे असहिष्णू असतात त्यांना मनुवादी किंवा गोडसेवादी म्हणायला हरकत नाही. तरीही दिव्रिटो यांनी थोडा विचार करावा. या अनिर्दिष्ट विचारवंतांच्या मते जर 'मनुवाद' आणि 'गोडसेवाद' हे पर्यायी शब्द असतील तर दिव्रिटो यांनी जे म्हटले आहे की "मनुवाद्यांनी तुकाराम, ज्ञानेश्वर यांचा छळ केला" ते वाक्य असे लिहिता येईल : 'गोडसेवाद्यांनी तुकाराम, ज्ञानेश्वर यांचा छळ केला.' यात कालविपर्यास होईल.

जे लोक पराकोटीचे असहिष्णू आहेत त्यांचे वर्णन 'ते पराकोटीचे असहिष्णू आहेत' असे न करता (अनिर्दिष्ट विचारवंतांचे अनुयायित्व पत्करून) ते 'मनुवादी' आहेत असे दिव्रिटो कां करतात? त्यांचा असा निर्देश केल्याने काही गोष्टी सूचित होतात. मनु हा हिंदू परंपरेतला श्रेष्ठ स्मृतिकार आहे; तो युगप्रवर्तक आहे. 'यद् वै किं च मनुरवदत् तद भेपजम्' असे वेदवचन आहे. (जे मनु म्हणतो ते औषधाप्रमाणे हितकर आहे.) आता, मनु, आणि सर्व श्रुति-स्मृती, चातुर्वर्ण्याचा पुरस्कार करतात. चातुर्वर्ण्य विषमतावादी आहे. तेव्हा हिंदू धर्म विषमतावादी आहे, तो अन्यायी आहे. आता, दिव्रिटो हे पराकोटीचे समतावादी आहेत. त्यांनी ह्या संदर्भात कडक भाषा वापरली आहे. "वर्णव्यवस्था हा आपल्या समाजजीवना-वरील एक कलंक आहे". (पृ. ८) ते पुढे म्हणतात, "... ख्रिस्ती धर्म मूलतः समतावादी आहे." (पृ. ८) येथे हा संदेश सूचित आहे की, हिंदू राहून तुम्हाला समतावादी असता येणार नाही. तुम्ही समतावादी असाल आणि तुम्हाला धर्म हवा असेल तर तुम्हाला ख्रिस्ती झाले पाहिजे.

आता एक प्रश्न उद्भवतो. गांधीजींचे काय करायचे? ते स्वतःला 'हिंदूतला हिंदू' म्हणवत. आणि ते समतावादी होते. आता दिव्रिटो यांच्या एवढे ते प्रखर समतावादी नसतील. कारण दिव्रिटो यांनी म्हटले आहे की, "विपम सामाजिक व्यवस्थेचे जे लाभार्थी आहेत, त्यांनी समतेच्या विचारांचे स्वागत केलेले नाही. उलट समतेचा विचार गाडून टाकण्याचा प्रयत्न केला आहे."(पृ. ८) गांधीजी विषम सामाजिक व्यवस्थेचे लाभार्थी होते. त्यांनी समतेचा विचार गाडून टाकण्याचा प्रयत्न केला असे म्हणणे कठीण असले तरी, त्यांनी स्वतःच्या आणि हिंदू समाजाच्या जीवनात समता आणण्यासाठी जे प्रयत्न केले त्यांना मूलतः समतावादी असलेल्या ख्रिस्ती धर्माचे पालन करण्याऱ्या दिव्रिटोंच्या प्रखर समतानिष्ठेचा निकप लावला तर ते काहीसे हिणकस ठरतीलही. पण गांधीजी एकंदरीत समतावादी होते आणि हिंदू होते, आणि दिव्रिटोंना प्रिय असलेल्या प्रकारचे म्हणजे 'सेक्युलर हिंदू' नव्हते, पक्के धार्मिक हिंदू होते, हे दिव्रिटोसुद्धा मान्य करतील.










– २ –

दिब्रिटो यांच्या विवेचनात गर्भित असलेल्या काही प्रश्नांचे विवेचन करण्यापूर्वी विचाऱ्या मनूतर्फे काही बोलणे इष्ट ठरेल. मनूने आणि एकंदरीत श्रुति-स्मृतींनी चातुर्वर्ण्याचा पुरस्कार केला हे अगदी खरे आहे. चार वर्ण आणि त्यांच्या संकरातून निर्माण झालेली प्रजा (भिन्न जमाती) यांचा मिळून झालेला समाज स्मृतिकारांपुढे होता. आणि ह्या समाजाचे काही प्रमाणात ते नियमन करीत होते आणि काही प्रमाणात वर्णन करीत होते. चातुर्वर्ण्य अन्यायी आहे यातही काही शंका नाही. पण मनूने (व अन्य स्मृतिकारांनी) आणखीही काही धर्म सांगितले आहेत.

**अहिंसा सत्यम् अस्तेयं शौचम् इन्द्रियनिग्रहः।**
**एतं सामासिकं धर्मं चातुर्वर्ण्येऽब्रवीन्मनुः।**

*(मनुस्मृति १०, ६३)*

[अहिंसा, सत्य, चोरी न करणे, (शारिरिक व मानसिक) शुचिता आणि इंद्रियनिग्रह हा चारही वर्णांना बंधनकारक असलेला धर्म मनूने थोडक्यात सांगितला आहे.]

ब्राह्मणांना सांगितलेल्या धर्मांत पुढील धर्म आहे :

**धृतिः क्षमा दमोऽस्तेयं शौचम् इन्द्रियनिग्रहः।**
**धीर्विद्या सत्यम् अक्रोधो दशकं धर्मलक्षणम्।।**

*(मनुस्मृति, ६.६२)*

[अधीर न होणे (संतुष्ट असणे), क्षमा — म्हणजे दुसऱ्याने अपकार केला असताही त्याला अपकार न करणे, दम — म्ह. मनात विकार निर्माण होऊ न देणे, अस्तेय — म्ह. अन्यायाने दुसऱ्याचे धन हिरावून न घेणे, शरीर व मन शुद्ध राखणे, इंद्रियांवर तावा असणे, बुद्धीचा विकास करणे, ज्ञान मिळविणे, सत्यनिष्ठ राहणे, क्रोधाचे कारण असताही न रागावणे अशी धर्माची दहा लक्षणे आहेत.]

मनूने ब्राह्मणांना अनेक जीवनवृत्ती सांगितल्या आहेत. पण आदर्श जीवनवृत्ती अशी :

**अद्रोहेणैव भूतानाम् अल्पद्रोहेण वा पुनः।**
**या वृत्तिस्तां समास्थाय विप्रो जीवेदनापदि।।**
**ऋतामृताभ्याम् जीवेत् तु मृतेन प्रमृतेन वा।**
**सत्यानृताभ्याम् अपि वा न श्ववृत्त्या कदाचन।।**
**ऋतम् उञ्छशिलं ज्ञेयम् अमृतं स्यादयाचितम्।**
**मृतं तु याचितं भैक्षं प्रमृतं कर्षणं स्मृतम्।।**
**सत्यानृतं तु वाणिज्यं तेन चैवापि जीव्यते।**
**सेवा श्ववृत्तिराख्याता तस्मात् तां परिवर्जयेत्।।**
**कुशूलधान्यको वा स्यात् कुम्भीधान्यक एव वा।**
**त्र्यहैहिको वापि भवेद् अश्वस्तनिक एव वा।।**
**चतुर्णाम् अपि चैतेषां द्विजानां गृहमेधिनाम्।**
**ज्यायान् परः परो ज्ञेयो धर्मतो लोक जित्तमः।।**

*(मनुस्मृति, ४-२-८)*

[ज्यामध्ये दुसऱ्यास पीडा होत नाही.... अशा अद्रोहाने किंवा निदान अल्पद्रोहाने होणारी जी वृत्ती (निर्वाहाचे साधन) तिचा आश्रय करून ब्राह्मणाने आपत्काल नसेल तेव्हा जीव धारण करावा. ऋत व अमृत यांच्या योगाने जीवंत राहावे अथवा मृत वा प्रमृत यांच्या योगाने निर्वाह करावा. निदान सत्य व अनृत यांच्या योगाने उपजीविका करावी पण आपत्ती नसताना श्ववृत्ती पत्करून उदरभरण करू नये. रस्त्यात किंवा कोणाचा अधिकार नाही अशा स्थळी पडलेल्या धान्याचा एक एक कण उचलून घेणे यास उञ्छ म्हणतात आणि कणसे वेचणे यास शिल म्हणतात. ह्या उञ्छाची व शिलाची सत्याइतकी योग्यता आहे.... म्हणून या दोघांस ऋत म्हणजे सत्य म्हणतात. सारांश, उञ्छ व शिल यांवर निर्वाह करणे ही ऋतवृत्ती होय. याचना केल्यावाचून जे मिळते ते अमृत होय. याचना करून मिळविलेल्या अन्नास मृत म्हणतात.... शेत नांगरून पेरून मिळविलेले जे अन्न ते प्रमृत होय. (कारण नांगरताना व शेतांतील इतर सर्व व्यवहार करताना भूमिगत अनेक प्राण्यांची हिंसा होत असल्यामुळे ते अतिशयच मृत आहे.) वाणिज्यास सत्यानृत म्हणतात... पण सेवेस (नोकरीस) श्ववृत्ती म्हटले आहे. श्ववृत्ती म्हणजे कुत्र्याची वृत्ती. यास्तव ब्राह्मणाने तिचा त्याग करावा.... नित्य-नैमित्तिक धर्मकृत्ये व माता, पिता, भगिनी... इत्यादी पोष्यवर्ग यांसह तीन वर्षे किंवा त्याहून काही अधिक निर्वाह होईल इतके धान्य जो आपल्याजवळ ठेवतो तो कुशूलधान्यक होय. पूर्वोक्त कर्मे व पोष्य वर्ग यांसह एक वर्षभर निर्वाह होईल इतके धान्य जो ठेवतो त्यास कुम्भीधान्यक म्हणतात. सारांश कुशूलधान्यक अथवा कुम्भीधान्यक होऊन राहावे अथवा तीन दिवसांची सामग्री जवळ ठेवणारा किंवा दुसऱ्या दिवसाचीही सामग्री न ठेवणारा (अश्वस्तनिक) असे त्याने व्हावे.... चारी प्रकारच्या गृहस्थ ब्राह्मणांतील पुढचा पुढचा ब्राह्मण श्रेष्ठ होय. (अर्थात् अश्वस्तनिक सर्वात उत्तम.)" (विष्णुशास्त्री बापट यांचे भाषांतर.)]










तेव्हा, मनूने ब्राह्मणांना अपरिग्रहाचे कठोर व्रत सांगितलेले आहे. 'मनुवादी' ब्राह्मण म्हणून जगणे सोपे नाही हे फा. दिव्रिटो यांना वरील उतारा वाचून पटेल. "विषम सामाजिक व्यवस्थेचे जे लाभार्थी आहेत त्यांनी समतेच्या विचारांचे स्वागत केलेले नाही" असे दिव्रिटो म्हणतात. (पृ. ८) मनुवादी (मनूचे आदेश स्वीकारणारे) ब्राह्मण विषम सामाजिक व्यवस्थेचे लाभार्थी नाहीत. इतिहासात बहुसंख्य ब्राह्मण ह्या रीतीने जगलेले नाहीत हे उघड आहे. म्हणजे ते मनुवादी नव्हते पण विषम समाजव्यवस्थेचे लाभार्थी होते. मनुवादी ब्राह्मणापेक्षा कॅथलिक धर्मगुरू म्हणून जगणे खूपच सोपे आहे. अँग्लो-कॅथलिक टी.एस्. एलिअट म्हणतो –

> *"The 'potamus can never reach*
> *The mango on the mango tree*
> *But pomegranate and peach*
> *Feed the Church from oversea."*

– ३ –

हिंदू धर्म हा एक नैसर्गिक धर्म आहे. आदिम काळापासून चालत आलेला हा धर्म आहे. सोयीसाठी ज्या जमातीचा 'वैदिक जमात' असा निर्देश करता येईल त्या जमातीच्या देवदेवतांविषयीच्या कल्पना, त्यांच्या संबंधातले विधी, देवतांची स्तोत्रे, प्रार्थना, त्यांना आवाहन करणारे मंत्र, इ. ह्यांचा संग्रह म्हणजे वेद, आणि वेदांगे, धर्मसूत्रे, स्मृती, इ. ग्रंथ. ह्या साहित्यावरून, ह्या जमातीने प्रगल्भ बौद्धिक संस्कृती विकसित केली होती असे दिसते. ह्या समाजाची सामाजिक रचना, चालीरीती, प्रथा, विवाह, कुटुंब इ. सामाजिक संस्था, त्यांना आधारभूत असलेली मूल्ये ह्या साहित्यात प्रतिबिंबित झाली आहेत. आदिम समाजात असते त्याप्रमाणे ह्या समग्र सामाजिक व्यवस्थेला धार्मिक प्रामाण्य होते. अशा समाजात आढळते त्याप्रमाणे, पारलौकिक आणि लौकिक (ऐहिक) ही भेदरेषा तेव्हा नव्हती. ह्या समाजाची भारतात विखुरलेल्या इतर जमातींशी स्वाभाविकपणे गाठभेट झाली. त्यांच्यांत आदानप्रदान सुरू झाले. बौद्ध, जैन इ. धर्म वैदिक धर्मापासून फुटून निघालेले प्रॉटेस्टंट धर्म आहेत असे दिव्रिटो यांचे म्हणणे आहे. 'वैदिक धर्मापासून भांडून निराळे झालेले' असे त्यांचे वर्णन त्यांनी केले आहे. ह्याविषयी त्यांनी अधिक विचार करावा अशी विनंती आहे. जैन आणि बौद्ध धर्म ही, वैदिक परंपरेहून भिन्न असलेल्या श्रमण परंपरेला महावीर आणि बुद्ध ह्या महान प्रतिभावान व्यक्तींनी दिलेली रूपे आहेत. महावीर आणि बुद्ध हे कुणाशी भांडतील असे सुचविणे हास्यास्पद आहे. ('आपला धर्म जो आहे तेवढाच सद्धर्म आहे' अशा श्रद्धेत वाढलेल्यांना हे समजणे कठीण आहे.) उलट जैन व बौद्ध ह्या नैतिक आणि आध्यात्मिक परंपरांतील आशय वैदिक परंपरेने आत्मसात केला. अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, अपरिग्रह इ. साधारण धर्मांची वर्णधर्मात भर पडली. मनूचे वर उल्लेखिलेले दशलक्षणक धर्म आणि सामासिक धर्म हे या परंपरांचे योगदान आहे. आगमांवर आधारलेले शैव, शाक्त, वैष्णव, इ. संप्रदाय हेही मूळात अवैदिक आहेत. त्यांनी वैदिक परंपरेचे छत्र स्वीकारले, पण वेद सांगतात त्याहून आगम काहीतरी अधिक सांगतात ही भूमिका सोडली नाही. ह्या सर्व संप्रदायांमधील आदान-प्रदानातून एक समान आध्यात्मिक-नैतिक संस्कृती येथे स्थिर झाली.

> **यं शैवाः समुपासते शिव इति ब्रह्मेति वेदान्तिनो।**
> **बौद्धार्बुद्ध इति प्रमाणपटवः कर्तेति नैयायिकाः।।**
> **अर्हन् इत्यथ जैनशासनरताः कर्मेति मीमांसकाः।**
> **सोऽयं वो विदधातु वाञ्छितफलं त्रैलोक्यनाथो हरिः।।**

[शैव ज्याची शिव म्हणून उपासना करतात आणि वेदान्ती ब्रह्म म्हणून करतात, बौद्ध बुद्ध म्हणून करतात, प्रमाणविद्येत प्रवीण असलेले नैयायिक जगत्कर्ता म्हणून करतात, जैन अर्हत् म्हणून करतात, मीमांसक कर्म (वैदिक कर्म) म्हणून करतात, तो त्रैलोक्यनाथ हरी तुम्हाला वांछित फल देवो.]

ह्या उपासनाविषयांत अल्ला आणि (ख्रिस्ती) प्रभूचा अंतर्भाव केला की त्यात सर्वधर्मसमभावाचा आज जो आशय आहे तो पूर्णांशाने व्यक्त होईल. शंकराचार्यांवर ते प्रच्छन्नबौद्ध आहेत असा आरोप आहे. ह्यात खूप तथ्य आहे. जो आध्यात्मिक-नैतिक-बौद्धिक संश्लेष येथे निर्माण झाला त्याचे शंकराचार्य हे एक प्रतीक आहे.

ह्यातून जी नैतिक व बौद्धिक प्रगल्भता आली तिच्यामुळं मूळ वैदिक धर्माचे परत परत परिष्करण होत आले आहे. त्यात सुधारणा होत आल्या आहेत. वेदात पशुयाग आहे. तो सोडून देण्यात आला. स्मृतीत नियोगाची चाल आहे. ती रद्द करण्यात आली. शंकराचार्यांनी वैदिक कर्मकांडाचे प्रामाण्य अमान्य न करता अध्यात्माच्या क्षेत्रात त्याचे स्थान अगदी गौण आहे अशी भूमिका स्वीकारली. आधुनिक सामाजिक



अनुक्रमणिका

आणि नैतिक विचाराच्या प्रभावाने हिंदू धर्माचे असेच व्यापक परिष्करण एकोणिसाव्या शतकात झाले.

हिंदू समाजव्यवस्थेचे आणखी एक वैशिष्ट्य ध्यानात घेतले पाहिजे. श्रुतिस्मृतींत वर्णव्यवस्थेचा पुरस्कार आहे ह्यात शंका नाही. पण भारतीय समाज रेखीवपणे चार वर्णांत बंदिस्त झालेला असा कधी होता का ह्या प्रश्नाचे उत्तर देणे सोपे नाही. धर्म समजून घेण्यासाठी जेव्हा मनूकडे महर्षी जातात तेव्हा त्यांनी मनूला केलेली विनंती अशी :

**भगवन्सर्ववर्णानां यथावदनुपूर्वतः।**
**अन्तरप्रभवाणां च धर्मान्नो वक्तुमर्हसि।।**

*(मनुस्मृति १, २)*

[हे भगवन्, सर्व वर्णांचे आणि त्यांच्या संकरापासून निर्माण झालेल्या जाती यांचे धर्म क्रमाने आम्हांस सांगावे.]

या देशात अनेक जमाती विखुरलेल्या होत्या आणि त्या चार वर्णांच्या संकरातून अस्तित्वात आल्या हे एक कल्पित (legal fiction) होते. ह्या जमातींची अंतर्गत स्वायत्तता स्मृतींनी मान्य केली होती. दिव्रिटो म्हणतात की, मनुवाद्यांनी स्त्री-शूद्रांना स्वातंत्र्य नाकारलेले आहे. (पृ. ९) ह्याचा पुढे विचार करू. (लेखाच्या शेवटी असलेले परिशिष्ट पाहावे.) आताचा मुद्दा असा आहे की, चार वर्णांत सामावू न शकणाऱ्या ज्या जमाती होत्या त्यांची अंतर्गत स्वायत्तता स्मृतींनी मान्य केली होती आणि तिचे संरक्षण करणे हे राजाचे कर्तव्य आहे असा नियम घालून दिला होता. पाहा :

**पाषण्डनैगमश्रेणीपूगव्रातगणादिषु**
**संरक्षेत् समयं राजा दुर्गे जनपथे तथा।।**

*(नारदीयमनुसंहिता ११-२)*

[ह्याचा *स्मृतिचंद्रिका* या टीकेत दिलेला अर्थ असा : पाषण्ड म्हणजे वेदोक्तलिङ्गाशिवाय (गंध, भस्म, यज्ञोपवीत, इ.) इतर लिङ्गे धारण करणारे इतर सर्व लोक (म्हणजे इतर धार्मिक संप्रदायांचे लोक). त्यांचे जे मठ असतात त्यांच्या हिताचे संरक्षण, संवर्धन करण्यासाठी त्या संप्रदायांत सर्वसंमत असलेले आचरणाचे नियम (समय) असतात. नैगम म्हणजे मालाची ने-आण करणारे तांडे व व्यापारी. त्यांच्यांत गणवेष धारण करणाऱ्या संदेशवाहकाला तिरस्काराने वागविणाऱ्याला शिक्षा करावी असे अनेक समय (संकेत, करार) असतात. श्रेणी म्हणजे एकाच प्रकारच्या कारागिरीवर उपजीविका करणारे विणकरादि कारागीर. त्यांच्यात अमूक श्रेणीनेच विक्री करावी असे समय असतात. पूग म्हणजे हत्ती किंवा घोडे यांच्यावर आरोहण करणारे. व्रात म्हणजे नाना प्रकारची शस्त्रे धारण करणारे. पूग आणि व्रात ह्यांच्यांत एकमेकांना सोडून समरात भाग घेणार नाही असे समय असतात. गणामध्ये, पाचव्या दिवशी किंवा पाचव्या वर्षी कान टोचावे असे समय असतात..... दुर्गामध्ये धान्य इत्यादी घेऊन अन्यत्र जाणाऱ्याने ते तेथे विकू नये असे समय असतात.... 'जनपदे तथा' ह्याने ग्राम, घोष, पुर यांचाही निर्देश होतो. गायरानात शेती करायची नाही असे समय गावात असतात. आभीर स्त्री-पुरुषांना जर व्यभिचार करताना पकडले तर शिक्षा करायची नाही असा समय गवळीवाड्यात असतो. नगरात, पैसे न घेता, श्रीमंत माणसांचे यथाशक्ती संरक्षण करणाऱ्यांनी दरोडेखोरांना ठार मारण्यास हरकत नाही ह्या स्वरूपाचे समय असतात. ह्या सर्व समयांचा भंग होणार नाही किंवा उल्लंघन होणार नाही अशा रीतीने राजाने वागावे.]

याज्ञवल्क्य-स्मृतीत असे म्हटले आहे की,

**श्रेणिनैगमपाषण्डिगणांनामप्ययं विधिः।**
**भेदं चैषां नृपो रक्षेत् पूर्ववृत्तिं च पालयेत्।।**

*(२, १९२)*

[याचे स्पष्टीकरण देताना मिताक्षरा म्हणते 'भेदं धर्म-व्यवस्थां नृपो रक्षेत्' म्हणजे श्रेणी इत्यादींची जी धर्मव्यवस्था चालू आहे ती राजाने रक्षावी.]

सारांश, हे सर्व समूह, संघ, जमाती स्वायत्त आहेत. त्यांचा जो धर्म, जो अंतर्गत व्यवहार आणि इतर जमातींशी होणारा व्यवहार वहिवाटीप्रमाणे (पूर्ववृत्ती) चालू आहे त्याचे संरक्षण राजाने करायचे आहे. ह्यात 'पाखंडी' धर्मही समाविष्ट आहेत. वर उद्धृत केलेल्या *नारदीयमनुसंहिता* ११-२ वर टीका करताना *दण्डविवेकः* ही टीका म्हणते, " 'आदि' ह्या पदाने संघ इत्यादींचा अंतर्भाव होतो. जैन, बौद्ध यांचे समूह म्हणजे संघ, चाण्डाल इत्यादींचे समूह म्हणजे गुल्म, अनिर्दिष्ट समूह म्हणजे वर्ग". ('आदि'पदेन संघादिसंग्रहः तत्रार्हतसौगतादि-समूहः संघः, चाण्डालादिसमूहो गुल्मः, अनुक्तसमुदायो वर्गः।) ह्या सर्वांची त्यांनी स्वतः परस्परांत केलेल्या समयाप्रमाणे जी धर्मव्यवस्था असेल तिचे संरक्षण करणे हे राजाचे कर्तव्य आहे.

चांडाल हे शूद्र आहेत पण एक जमात म्हणून त्यांना अंतर्गत स्वायत्तता आहे. त्यांचा जो धर्म असेल तो स्मृतिप्रणीत नाही.



अनुक्रमणिका

अशा स्वायत्त जमातींची वीण, अनेक बंधनांनी ह्या जमातींना परस्पराशी जोडणारे जाळे असे पारंपरिक भारतीय समाजाचे - हिंदू समाजाचे - स्वरूप होते. (ह्या जाती-जमातींत उच्च-नीच भाव जरूर होता.) ह्यामुळे ह्या धर्मात स्थानिक देवता आहेत. भिन्न जाति-जमातींच्या विशिष्ट देवता आहेत. ह्या देवदेवतांना विष्णू, शंकर, लक्ष्मी इ. प्रतिष्ठित पौराणिक देवदेवतांशी जोडणाऱ्या पुराणकथा, मिथ्यकथा आहेत. शंकराचार्य, रामानुज इ. आचार्यांचे प्रगल्भ तत्त्वज्ञान आहे. ह्या सर्वांवर वेदोपनिषदांचे छत्र आहे. वेद-उपनिषदे यांचा आशय मूठभर ब्राह्मण पंडितांना अवगत आहे. पण उपनिषदांचे सार भगवद्गीतेद्वारा, तिच्यावरील ज्ञानेश्वरीसारख्या भाष्यांद्वारा, संतांच्या शिकवणीवर आणि त्यांनी घालून दिलेल्या आदर्शांवर आधारलेल्या वारकरी संप्रदायांसारख्या संप्रदायांद्वारा, जनमानसात रुजला आहे. हा हिंदू परंपरेचा संभार आहे.

ग्रीक धर्महीे असाच एक नैसर्गिक धर्म होता आणि आदिम विधी व श्रद्धा यापासून तो प्लेटो-प्लॉटिनस यांच्या उदात्त तत्त्वज्ञानापर्यंतच्या विकासाचे टप्पे ग्रीक साहित्यात नमूद आहेत. (जिज्ञासूंनी गिल्बर्ट मरी यांचे '*Five Stages of Greek Religion*' हे पुस्तक पहावे.) पण जर्मन, रोमन आणि अन्य नैसर्गिक धर्मांचा जो विकास होऊ शकला असता त्याला ख्रिस्ती धर्म आणि नंतर इस्लाम यांनी पायबंद घातला. इतकेच नव्हे तर, हे धर्मच त्यांनी उखडून टाकले. ख्रिस्ती व इस्लाम या धर्मांनी अंकित केलेल्या प्रदेशांत बऱ्याच प्रमाणात एक समान धार्मिक संस्कृती प्रस्थापित झाली. विविधता नष्ट करणारी अशी ही समानता आहे.

– ४ –

स्थूलमानाने दोन प्रकारच्या पारंपरिक धर्मव्यवस्था आहेत असे म्हणता येईल. एका प्रकारच्या व्यवस्थेत अभिजनांचा जो धर्म असतो त्याचे सामाजिक प्रभुत्व असते. पण प्रत्येक घटक-जमातीला आपला पारंपरिक धर्म व चालीरीती पाळण्याची मुभा असते. अनेक धार्मिक जमातींचा समूह असे समाजाचे स्वरूप असते. ह्या व्यवस्थेचा लाभ असा की, सर्व जमाती संरक्षित राहतात. तिचा तोटा असा की विविध जमातींत परस्परांविषयी उदासीनता, उच्च जमातींचा कनिष्ठ जमातीं-विषयीचा तुच्छताभाव इ. अनिष्ट सामाजिक प्रवृत्ती तिच्यात मूळ धरू शकतात. हिंदू धर्मव्यवस्था अशी होती. रोमन साम्राज्यातही अशीच व्यवस्था होती. दुसऱ्या व्यवस्थेत एकच धर्म खरा मानला जातो आणि इतर सर्व धर्मांचा पाखंडीपणाचे प्रकार म्हणून उच्छेद करण्यात येतो. ह्या व्यवस्थेचा लाभ असा की, एक समान धार्मिक संस्कृती मोठ्या प्रदेशात वसलेल्या भिन्न मानवसमूहांत मूळ धरते. तोटा असा की, हा एकजिनसीपणा स्थानिक संस्कृतीचा नायनाट करून प्रस्थापित करण्यात आलेला असतो. ख्रिस्ती धर्माने सबंध युरोपभर, अमेरिकेत, ऑस्ट्रेलियात मूळच्या संस्कृतींचा उच्छेद करून स्वतःची तेथे स्थापना केली. इस्लामने आशियाच्या मोठ्या भागात आणि उत्तर आफ्रिकेत अशाच रीतीने इस्लामी संस्कृती स्थापन केली. ह्या प्रसाराला बऱ्याच प्रमाणात पायबंद घातला तो भारतीय (हिंदू) आणि चिनी संस्कृतींनी.

आज मानवजातीपुढे जे नैतिक आव्हान आहे त्याचे स्वरूप थोडक्यात असे सांगता येईल : स्थानिक समाज, विशिष्ट जमाती ह्यांच्या सांस्कृतिक स्वायत्ततेचा आदर करीत, त्यांचे परस्परांशी विधायक, सुसंवादी संबंध जोडीत, समग्र मानवजातीला व्यापणारे एक जाळे (network) प्रस्थापित करण्याचा मार्ग कसा शोधून काढावा? ह्या प्रश्नाचे उत्तर द्यायला महावीर, बुद्ध, येशू, गांधीजी यांच्यासारख्या असामान्य नैतिक प्रतिभेच्या व्यक्तींची आवश्यकता आहे. पण अशा व्यक्तींच्या उदयाची पूर्वतयारी सामान्य माणसे, आपापल्या परीने, निष्ठेने करू शकतील.

– ५ –

अडीच हजार वर्षांहून दीर्घ काळ नांदत आलेल्या आणि विकसित झालेल्या धर्माविषयी हा धर्म विषमतावादी आहे (किंवा समतावादी आहे), वर्णाश्रमसंस्थेवर आधारलेला आहे (किंवा नाही) अशा स्वरूपाची त्याचे सार मांडू पहाणारी विधाने करणे गैर आहे. त्या, त्या कालखंडात धार्मिक श्रद्धेचे स्वरूप काय होते, आशय काय होता, कोणते विधी, संस्कार प्रचलीत होते, धार्मिक आचरणात कोणते विधिनिषेध पाळले जात होते, कोणत्या सामाजिक चालीरीतींना, नात्यांना धार्मिक प्रामाण्य होते, कोणत्या सामाजिक प्रथा केवळ लौकिक होत्या ह्या गोष्टी लक्षपूर्वक पहाव्या लागतील. आश्रम ही संस्था कधीच लुप्त झाली. ब्राह्मण जाती सोडल्या तर, वर्ण लुप्त झाले. वर्णव्यवस्थेची जागा जातिव्यवस्थेने घेतली. ब्राह्मण जातीमध्ये अनेकदा शुद्धत्वाचा, श्रेष्ठत्वाचा दर्प आढळत असला तरी,






अनुक्रमणिका

मूठभर अपवाद सोडले तर, ब्राह्मण आपला वर्णधर्म पाळीत नाहीत हे आपण वर पाहिलेच आहे. आज जो हिंदू धर्म पाळला जातो आहे तो मनुस्मृतीवर आधारलेला आहे असे दिब्रिटो ह्यांना खरोखरच वाटत असेल तर त्यांनी ह्या समजुतीचे परीक्षण करावे अशी विनंती आहे. धार्मिक राजकारणाचे हत्यार म्हणून त्यांना 'मनुवाद' हा शब्द वापरायचा असेल तर गोष्ट वेगळी. पण ह्या न्यायाने कॅथलिक धर्मगुरूंना 'इन्क्विझिशनवादी' म्हणता येईल. 'वर्णव्यवस्था आपल्या जीवनावरील एक कलंक आहे' असे ते म्हणतात. इन्क्विझिशन हा मानवी जीवनावरील कलंक आहे. आता दिब्रिटो म्हणतील, 'आम्ही तो पुसला.' कलंक असे पुसता येत नाहीत. जिआर्डानो ब्रूनो, ज्याला चर्चने जीवंत जाळले, त्याला त्याचे उरलेले नैसर्गिक आयुष्य पुन्हा देता येत नाही.

एकोणिसाव्या शतकात हिंदू धर्मात मूलगामी परिवर्तन झाले. ह्याची प्रेरणा त्या काळच्या ब्रिटन, फ्रान्स, जर्मनी इ. देशांतील धार्मिक, नैतिक, सामाजिक विचारांपासून व ह्या विचारांवर आधारलेल्या धार्मिक, नैतिक, सामाजिक आदर्शांपासून हिंदू विचारवंतांना लाभली हे निःसंशय. काही प्रॉटेस्टंट ख्रिस्ती पंथांपासूनही त्यांनी स्फूर्ती घेतली. आर्यसमाज, ब्राह्मसमाज, प्रार्थनासमाज ह्यांची स्थापना झाली. आर्यसमाजाने स्मृतींचे प्रामाण्य नाकारले. ब्राह्मसमाजाने व प्रार्थनासमाजाने वेदांचे प्रामाण्य नाकारले. जोतिबांचा सार्वजनिक सत्यधर्म हे हिंदू धर्माचे सुधारित स्वरूप नव्हते. तो एक वेगळाच धर्मपंथ होता. हिंदू धर्म सुधारणेच्या पलीकडे आहे असे त्यांचे मत होते. पण सत्यशोधक समाजाचे अनुयायी औपचारिक दृष्ट्या हिंदूच राहिले. ह्या सर्वांनी वर्णव्यवस्था व जातिव्यवस्था नाकारली. ह्या वैचारिक, धार्मिक, सामाजिक आंदोलनांना राजकीय अंगही होते. त्याचा आविष्कार राष्ट्रीय स्वातंत्र्यासाठी संघटित झालेल्या आंदोलनात झाला. सर्व धार्मिक जमातींनी त्याच्यात सहभाग घ्यावा असे ह्या आंदोलनाच्या नेत्यांचे भारतीयांना आवाहन होते. ह्या आंदोलनाची परिणती भारतात नागरी समाज (civil society) स्थापन करणारी राज्यघटना स्वीकारण्यात झाली. हा नागरी समाज धर्मनिरपेक्ष आहे, कोणत्याही धर्माच्या भारतीयाला त्याच्यात समान मूलभूत हक्क आहेत, धार्मिक व भाषिक अल्पसंख्यांकांना तो संरक्षण देतो, इ.इ.

आता, ह्या आंदोलनाचे बहुसंख्य नेते हिंदू होते आणि त्यांतील बहुसंख्य नेते धार्मिक हिंदू होते; दिब्रिटो यांना प्रिय असलेले सेक्युलर हिंदू नव्हते. ही किमया कशी काय झाली? कित्येकांची अशी कल्पना आहे की, ज्यांनी पुढे आपल्या अनुयायांसह हिंदू धर्म सोडला त्या डॉ. आंबेडकरांनी भारतीय राज्यघटना आपल्या डोक्यातून निर्माण केली. पण राष्ट्रसभेच्या सर्वमान्य नेत्यांनी, ज्यातील बहुसंख्य नेते हिंदू होते, जर आंबेडकरांना पाचारण केले नसते तर ते राज्यघटनेचे प्रमुख शिल्पकार होऊ शकले नसते. दुसरी गोष्ट अशी की, अन्य कुणी आंबेडकरांच्या जागी असता तरी जी राज्यघटना मान्य झाली असती ती आजच्या राज्यघटनेहून फारशी वेगळी नसती. जी सामाजिक, राजकीय, आर्थिक मूल्ये आणि तत्त्वे ह्या राज्यघटनेत मूर्त झाली आहेत त्यांचा, एक शतकभर चाललेल्या धार्मिक, सामाजिक, राजकीय मंथनाचा परिपाक म्हणून भारतीय जनतेने – तिच्या राजकीय दृष्ट्या जागृत असलेल्या विभागाने – स्वीकार केला होता. काही मूठभर नेत्यांनी उदासीन जनतेवर लादलेली अशी ही मूल्ये व तत्त्वे नव्हती.

– ६ –

आता दिब्रिटो यांना अशी विनंती आहे की, त्यांनी दोन प्रश्नांचा विचार करावा. एक असा : ते म्हणतात, "भारतीय संस्कृतीचे महावस्त्र अनेक धर्मांच्या धाग्यांनी विणलेले आहे. त्यातला एक जरी धागा उसवला तर संपूर्ण वस्त्राच्या चिंध्या होण्यास वेळ लागणार नाही..." (पृ. ७). प्रश्न असा आहे की, आज जे पाकिस्तान आहे आणि जो बांगला देश आहे, हे दोन देश पन्नास वर्षांपूर्वी भारताचे भाग होते. भारतीय संस्कृतीचे महावस्त्र ह्या देशांतही होते. हे दोन्ही देश त्यांनी स्वीकारलेल्या राज्यघटनेप्रमाणे स्वतःला इस्लामी राष्ट्रे म्हणवितात. पण उर्वरित भारत, जेथे हिंदू बहुसंख्य आहेत, तो सेक्युलर राज्यघटना स्वीकारतो. भारतीय संस्कृतीचे महावस्त्र, जेथे हिंदू बहुसंख्य आहेत तेथे, शाबूत राहते. पण जेथे ते बहुसंख्य नाहीत तेथे त्याच्या चिंध्या होतात. असा फरक का पडतो?. ह्याचा काही संबंध हिंदू मानसिकतेशी आहे का? इतरांचे वेगळेपण मनापासून मान्य करणाऱ्या आणि त्यांच्याशी सुसंवादाने (पण अलिप्तपणे) जगण्याची परंपरा जिने स्थिर केली त्या हिंदू मनोवृत्तीशी ह्याचा काही संबंध आहे का?

दुसरा प्रश्न असा की, गेली निदान दिडशे वर्षे जाति-व्यवस्थेवर टीका होत आहे; अनेकदा घणाघाती हल्ले झाले आहेत. मागासलेल्या जातींना इतरांच्या बरोबर आणण्याचा

प्रयत्न म्हणून त्यांना काही विशेष सवलती देण्यापलीकडे राज्यघटनेत किंवा तिच्यावर आधारलेल्या कायद्यात जातींचा उल्लेख येत नाही. असे असताना हिंदू समाजात, ख्रिस्ती समाजात, मुसलमानांत जाती का टिकून आहेत? ह्याला मनु जबाबदार आहे का? की असे आहे की, माणसाच्या जीवनाच्या गाभ्याशी भिडणाऱ्या अशा काही गरजा आहेत की त्यांचे समाधान जातींकडून होते आणि ह्या गरजांचे समाधान करणाऱ्या पर्यायी सामाजिक यंत्रणा, प्रथा, संकेत आपण निर्माण करू शकलो नाही, स्थिर करू शकलो नाही, व म्हणून जाती टिकून राहिल्या आहेत? शंभर वर्षांपूर्वी जातींचे जे स्वरूप होते ते आज नाही. आज व्यक्तींचे त्यांच्या जातीशी व अन्य जातींतील व्यक्तींशी जे संबंध आहेत त्यांचे वास्तव स्वरूप काय आहे? जाती नष्ट करा, सामाजिक समता वास्तवात प्रस्थापित करा ही घोषवाक्ये म्हणून ठीक आहेत. हे साधणारी रणनीती कोणती असू शकेल?

– ७ –

ख्रिस्ती धर्माविषयी काही अफाट विधाने दिव्रिटो यांनी केली आहेत. "... ख्रिस्ती धर्म मूलतः समतावादी आहे... समताधिष्ठित ख्रिस्ती धर्माला होणाऱ्या विरोधामागील हे एक मुख्य कारण आहे." (पृ. ८-९). त्यांनी दिलेले कारण असे की, ".... वर्णवर्चस्वाचा पुरस्कार करणाऱ्या शक्ती समतावादी विचाराचा स्वीकार करू शकत नाहीत." (पृ. ८) ह्या शक्ती म्हणजे अर्थात् हिंदू धर्म.

आता, *नव्या करारात* वर्णभेद सांगितलेला नाही हे खरे आहे. पण सामाजिक विषमतेची अनेक रूपे, प्रकार आहेत. रोमन कॅथलिक पंथ घेतला तर त्याच्या निर्विवाद सामाजिक प्रभुत्वाचा काळ म्हणजे मध्ययुग. रोमन साम्राज्याची पडझड झाल्यानंतर पश्चिम युरोपची सांस्कृतिक एकता टिकवून धरण्याचे कार्य रोमन चर्चने पार पाडले. धार्मिक प्रभुत्वासोबत ऐहिक सत्ताही चर्चकडे आली. सरंजामशाही समाजव्यवस्था पवित्र रोमन साम्राज्य 'होली रोमन एम्पायर', 'नाइटहूड आणि शिव्हर्ली', ह्यांत ख्रिस्ती धार्मिक संकल्पना, आदर्श आणि लष्करी व राजकीय संस्था ह्यांचा संगम झाला होता. सरंजामी व्यवस्थेचे एक वैशिष्ट्य असे होते की समाजाची भिन्न वर्गांत काटेकोरपणे विभागणी झाली होती. हे वर्ग म्हणजे सरदार, धर्मगुरू (क्लर्जी), शेतकरी (पीझंट्री), ह्याशिवाय भूदासांचा (सर्फ) वर्ग होता. त्यांचा दर्जा गुलामांपेक्षा फारसा वेगळा नव्हता. सरंजामी समाजव्यवस्थेला आकार देण्यात चर्चचा मोठाच भाग होता. वरिष्ठ-कनिष्ठ भावावर आधारलेली कॅथलिक धर्मगुरूंची साखळी (हायरार्की) आणि सरंजामी समाजातील श्रेष्ठ-कनिष्ठ-भावावर आधारलेली लॉर्ड, नाइट, स्क्वायर, व्हिलन (जमीन कसणारा शेतकरी), इ. सामाजिक रचना यांत बरेच साम्य होते. सबंध चर्चची संघटना घेतली तर, चर्च प्रचंड जमिनीची मालक होती. ज्या प्रसिद्ध तीन इस्टेट्स आहेत त्या म्हणजे लॉर्ड्स स्पिरिच्युअल, (बिशप आणि त्यांचे वरिष्ठ धर्मगुरू), लॉर्ड्स टेम्पोरल (सरदार) आणि कॉमन्स (सर्वसाधारण स्वतंत्र नागरिक). समाजव्यवस्थेला – सर्फ्डम धरून - चर्चची पूर्ण मान्यता होती. कार्डिनल ह्या दर्जाचा धर्मगुरू हा 'प्रिन्स' (राजा) असतो. रोमन कॅथलिक पंथ हा तरी समताधिष्ठित नाही हे उघड आहे.

समता हे जर ख्रिस्ती धर्माचे पायाभूत मूल्य असते तर सर्व ख्रिस्ती समाजांत सामाजिक व्यवहाराच्या सर्व क्षेत्रांत बऱ्याच प्रमाणात समता प्रस्थापित झालेली आढळून आली असती. पश्चिम युरोपमध्ये सर्व देशांत – जेथे कॅथलिक किंवा प्रॉटेस्टंट धर्मपंथ प्रभावी होते – पहिल्या महायुद्धापर्यंत ॲरिस्टॉक्रसी हा खराखुरा सत्ताधारी वर्ग होता, तो निर्वेधपणे सत्ता वापरीत होता, त्याचे भांडवलदारांशी संगनमत होते, प्रचंड आर्थिक विषमता होती आणि समाजाचे उच्च-नीच वर्गांत कठोरपणे झालेले विभाजन कडकपणे पाळण्यात येत होते.

ईश्वर सर्वांचा पिता आहे, सर्व माणसे एकमेकांचे बांधव आहेत, तेव्हा सर्वांनी ईश्वरावर आणि एकमेकांवर प्रेम करावे ही येशूची शिकवण आहे. शिवाय येशूने अपरिग्रहाचे व्रतही सांगितले आहे. "तेव्हा मी तुम्हाला सांगतो, स्वतःच्या जीवनाचा विचार करू नका, आपल्याला काय खायला मिळेल आणि काय प्यायला मिळेल; किंवा आपल्या शरीराचा विचार करू नका, आपल्याला काय नेसायला मिळेल. जीवन अन्नापेक्षा अधिक नाही का? आणि शरीर वस्त्रापेक्षा अधिक नाही का?" (संत मॅथ्यू, ७, २५) मनु म्हणतो त्याप्रमाणे अश्वस्तनिक व्हा. पण चर्चने ही शिकवण स्वतःच्या बाबतीत किंवा ख्रिस्ती समाजाच्या संदर्भात कधी अंमलात आणली नाही. ब्राह्मणांनीही मनूची सबंध शिकवण अंमलात आणली नाही. भारतीय ख्रिस्ती समाजात जातीपाती आहेत त्या विकृत हिंदू शिकवणीमुळे आणि संसर्गामुळे आहेत हे मान्य करू या. पण कॅथलिक



अनुक्रमणिका

चर्चने जगभर सामाजिक समता आणि आर्थिक समता का प्रस्थापित केली नाही?

आता स्वातंत्र्याकडे वळू या. दिब्रिटो म्हणतात "वास्तविक मनुवादी प्रवृत्तीचा मूलभूत स्वातंत्र्याला विरोध आहे. स्त्री, शूद्रांना त्यांनी स्वातंत्र्य नाकारले आहेच. पण एकूण स्वातंत्र्य (Liberty) व मानवी हक्क (Human Rights) या गोष्टी त्यांनी खुल्या मनाने स्वीकारल्या आहेत का? हा खरा प्रश्न आहे." (पृ. ९)

आता हा प्रश्न इन्क्विझिशनवादी कॅथलिक धर्मगुरूंना उद्देशूनही विचारता येईल. कॅथलिक चर्च धार्मिक आणि नैतिक क्षेत्रांत विचारस्वातंत्र्य नाकारते हे प्रसिद्ध आहे. पोप धर्मासनावर अधिष्ठित झालेला असताना (एक्स कथिड्रा) देवशास्त्र (थिऑलजी) आणि नीती (मॉरल्स) याविषयी जे आदेश देतो ते प्रमाण म्हणून सर्व कॅथलिकांना स्वीकारावे लागतात. येथे मतभेदाला, चर्चेला जागा नाही. हे आदेश अभ्रांतिशील (इनुफॅलिवल) म्हणून सर्व कॅथलिकांना मान्य करावे लागतात. नीतीचे क्षेत्र जीवनव्यापी आहे. मग कुठे आहे विचारस्वातंत्र्य?

रोमन कॅथलिक चर्चने प्रसृत केलेला Index Librorum Prohibitorium (ज्या ग्रंथांवर निषिद्ध म्हणून बंदी घालण्यात आली आहे त्यांची यादी) सर्वांना परिचित आहे. ज्या ग्रंथांच्या वाचनाने कॅथलिकांची धार्मिक श्रद्धा डागाळेल किंवा नीती भ्रष्ट होईल असा धोका होता त्यांची यादी अधिकृत सेन्सॉर तयार करीत असे, आणि ह्या ग्रंथांचे वाचन कॅथलिकांना निषिद्ध असे. ग्रंथांच्या प्रकाशनावर आणि वाचनावर, चर्च दोन प्रकारे सेन्सॉरशिप चालवीत असे. धार्मिक श्रद्धा व नीती ह्यांच्याविषयी कॅथलिकांनी लिहिलेली पुस्तके प्रकाशनापूर्वी अधिकृत सेन्सॉरकडून तपासून घेतली जात. ही प्रथा अजून चालू आहे. दुसरा प्रकार म्हणजे अपायकारक ठरतील अशा प्रकाशित ग्रंथांवर बंदी घालणे. धी सेक्रेड कॉन्ग्रेगेशन ऑफ् धी रोमन इन्क्विझिशनने पहिला 'इंडेक्स' १५५९ मध्ये प्रसिद्ध केला. विसावी आवृत्ती १९४८ मध्ये प्रसिद्ध झाली. १९६६ मध्ये ही यादी मागे घेण्यात आली. तेव्हा रोमन कॅथलिक चर्च व्यक्तिस्वातंत्र्याचा किती आदर करते हे स्पष्ट होईल.

दिब्रिटो ह्यांनी कहर केला आहे तो पुढील वाक्यांत. ते म्हणतात, "स्वातंत्र्य, समता आणि विश्वबंधुत्व ही त्रिसूत्री फ्रेंच राज्यक्रांतीतून (आणि पर्यायाने *नवीन करारा*तून) झिरपत आलेली असल्यामुळे, म्हणजे ही मूल्ये 'परदेशी' वाटल्यामुळे जीर्णमतवाद्यांना ती स्वीकारार्ह वाटत नसावी का?" (पृ. ९)

पहिली गोष्ट म्हणजे, फ्रेंच राज्यक्रांतीचे जे विचारवंत अध्वर्यू होते त्यांचा हल्ला दोन संस्थांवर केंद्रित झाला होता : एक म्हणजे धर्मसंस्था किंवा रोमन कॅथलिक चर्च – जे फ्रान्समध्ये तेव्हा प्रस्थापिताचे अंगभूत भाग होते – आणि दोन, राजेशाही. व्हॉल्टेअर चर्चचा उल्लेख 'धि इन्फेमस' – कुख्यात –असा करीत असे आणि चर्चला चिरडून टाकावे हे त्याचे घोषवाक्य होते. १७६२ मध्ये जेव्हा एका प्रॉटेस्टंटावर, आपल्या मुलाने रोमन कॅथलिक पंथ स्वीकारू नये म्हणून त्या मुलाला त्याने ठार मारले, असा खोटा आरोप करण्यात आला व चक्रावर त्याची हाडे मोडून त्याला ठार करण्यात आले तेव्हा व्हॉल्टेअर त्या निष्पाप बापाच्या बाजूने उभा राहिला आणि त्या दुर्दैवी बापाचा निरपराधपणा त्याने सिद्ध केला व त्या कुटुंबाला त्याने भरपाई देवविली. व्हॉल्टेअर रोमन कॅथलिक चर्चच्या रासवटपणाविरुद्ध सातत्याने लढत होता. दिदेरो, रूसो, कॉन्दिलाक इ. फ्रेंच राज्यक्रांतीचे प्रमुख वैचारिक नेते चर्चचे प्रभावी टीकाकार होते. ते नास्तिक किंवा 'डिइस्ट' होते. ख्रिस्ती श्रद्धेचा त्यांनी अव्हेर केला होता. स्वातंत्र्य आणि समता ही मूल्ये जरी रोमन कॅथलिक चर्चच्या दृष्टीने 'स्वदेशी' होती, परदेशी नव्हती तरी चर्चला ती स्वीकारार्ह वाटली नाहीत.

विश्वबंधुत्व हे मूल्य *नव्या करारात* आढळेल पण स्वातंत्र्य आणि समता ही मूल्ये तेथे आढळणार नाहीत. फ्रेंच राज्यक्रांतीला जे स्वातंत्र्य आणि समता अभिप्रेत होती ती ऐहिक होती. समाजाचे सदस्य म्हणून, नागरिक म्हणून सर्वांचा दर्जा समान असला पाहिजे, सर्वांना समान मूलभूत हक्क असले पाहिजेत असा ह्या समतेचा आशय आहे. हे हक्क म्हणजे जगण्याचा हक्क, स्वातंत्र्याचा (निर्णयस्वातंत्र्याचा) हक्क आणि आपले सुख साधण्याचा (आणि सुखाची साधने संपादन करण्याचा) हक्क. ह्या सामाजिक-आर्थिक-राजकीय संकल्पना, मूल्ये, तत्त्वे आहेत. चर्च आणि अनियंत्रित राजेशाही ह्यांच्याशी झगडून पश्चिम युरोपमध्ये साधारणपणे सोळाव्या ते एकोणिसाव्या शतकांत ती प्रस्थापित झाली. त्याचे श्रेय चर्चने घेऊ नये. एकोणिसाव्या शतकातल्या हिंदू समाजसुधारकांनी त्या 'परदेशी' असल्या तरी स्वीकारल्या आणि त्यांचा प्रसार केला.

– ८ –

आता असे म्हणता येईल, आणि म्हणणे योग्य ठरेल, की ह्या सर्व संकल्पनांना किंवा मूल्यांना आधारभूत असे एक नैतिक मूल्य आहे. ते म्हणजे मानवी व्यक्तीची व्यक्ती म्हणून अंगभूत प्रतिष्ठा मान्य करणे हे मूल्य. मानवी व्यक्ती ही केवळ नैसर्गिक वस्तू नाही, स्वायत्त नैतिक कर्ता असे तिचे स्वरूप आहे आणि ह्या तिच्या स्वरूपावर नागरी समता, स्वातंत्र्य आधारलेली आहेत. प्रेममय ईश्वराने आपल्या प्रतिमेत – आपल्याला काही प्रमाणात सदृश असा – मानवी आत्मा निर्माण केला. माणूस अशा आत्म्याचा धारक आहे ह्यात मानवी व्यक्तीची प्रतिष्ठा सामावलेली आहे. तेव्हा नागरी नैतिक मूल्यांना धार्मिक, आध्यात्मिक अधिष्ठान आहे. ख्रिस्ती परंपरा हे अधिष्ठान पुरविते. हा ख्रिस्ती धर्माचा दावा मी मान्य करतो. मानवी मूल्यांना अंतिमतः धार्मिक-आध्यात्मिक अधिष्ठान असते. धार्मिक-आध्यात्मिक मूल्ये सामाजिक मनात जर रुजलेली असली तर ते सामाजिक मन आधुनिक नागरी नैतिक मूल्यांचा स्वीकार करते. आध्यात्मिक मूल्ये नागरी मूल्यांच्या स्वीकाराची पूर्वतयारी करून देतात. नागरी नैतिक मूल्ये आध्यात्मिक मूल्यांनी सामाजिक व्यवस्थेच्या संदर्भात धारण केलेली रूपे असतात. सर्व माणसे ईश्वराची (अंशतः) रूपे आहेत आणि म्हणून त्यांची समान प्रतिष्ठा आहे ह्या ख्रिस्ती शिकवणीवर सामाजिक समतेचा सिद्धान्त – सर्व सामाजिक संदर्भात, सर्व सामाजिक रचनांत सर्व माणसांना समान दर्जा असला पाहिजे, समान हक्क असले पाहिजेत, सामाजिक उत्पादनात त्यांना समान वाटा असला पाहिजे हा सिद्धान्त – आधारता येईल. पण उच्च-नीच भावावर, श्रेष्ठता-कनिष्ठतेच्या संबंधांवर आधारलेल्या समाजरचनेत मूलगामी परिवर्तन करून समतेवर आधारलेल्या समाजरचनेत तिचे मानवी प्रयत्नांनी रूपांतर करता येते हा आधुनिक माणसाचा आत्मविश्वास आहे व म्हणून समतेच्या दिशेने वाटचाल करण्याचा प्रयत्न करणे हे माणसापुढील नैतिक आव्हान आहे; ही आधुनिक नैतिक संवेदनशीलता आहे. आता, अद्वैताचे तत्त्वज्ञान – किंवा सर्व माणसे (व प्राणी) हे ईश्वराचे अंश आहेत हे विशिष्टाद्वैती तत्त्वज्ञान – सामाजिक समतेच्या सिद्धान्ताला असेच आधारभूत होऊ शकेल. किंबहुना सर्वच मोक्षमार्गी भारतीय दर्शनांवर सामाजिक समतेचे तत्त्वज्ञान आणि त्यावर आधारलेला सामाजिक परिवर्तनाचा कार्यक्रम स्वाभाविक, अकृत्रिम रीतीने उभारता येईल. गांधीजी व विनोबा भावे ही ह्याची ठळक उदाहरणे आहेत. ह्या दृष्टीने पाहाता ख्रिस्ती धार्मिक तत्त्वज्ञान आणि भारतीय किंवा हिंदू तत्त्वज्ञान ह्यात कोणताही फरक नाही. सामाजिक समतेच्या सिद्धान्ताला मूलभूत नैतिक सिद्धान्त म्हणून स्वीकारणारा समाज परंपरेने ख्रिस्ती असलेल्या समाजाच्या उदरात उदयाला आला ही ऐतिहासिक वस्तुस्थिती आहे. पण ह्याची काही विशिष्ट ऐतिहासिक कारणेही आहेत. इतर धर्म पाळणारे समाजही ह्या मार्गाने जाऊ शकले असते. आता हा मार्ग सर्व धर्मांना खुला आहे आणि ह्या मार्गाने वाटचाल करण्याचे नैतिक आव्हान सर्व धर्मांपुढे आहे.

दुसरी ध्यानात घेण्यासारखी गोष्ट अशी की, मानवी समतेच्या मूल्याला ख्रिस्ती आध्यात्मिकतेची पार्श्वभूमी असली तरी रोमन कॅथलिक चर्च, इंग्लंडचे प्रस्थापित (एस्टॅब्लिश्ड) चर्च, इ. धर्मसंस्था सामाजिक समता प्रस्थापित करण्याच्या प्रक्रियेच्या विरोधात होत्या. ह्या धर्मसंस्थांतील धर्मगुरू हे, वर स्पष्ट केल्याप्रमाणे, शोषकवर्गातील होते, शोषित वर्गातील नव्हते. पश्चिम युरोपमधील अभिजनवर्गाच्या सदस्यांना (जन्टलमेन) खुले असलेले, म्हणजे त्यांना साजेसे ठरणारे, तीनच व्यवसाय होते. ते म्हणजे लष्करी व्यवसाय, किंवा कायद्याचा व्यवसाय किंवा चर्चमध्ये धर्मगुरू होणे. प्राचीन काळात गुलामगिरीची पद्धत बहुसंख्य समाजांत होती. आधुनिक काळात ख्रिस्ती धर्मानुयायांनी तिचे पुनरुज्जीवन केले. विशेषतः पश्चिम आफ्रिकेतून काळ्या आफ्रिकन्सना पकडून जहाजातून ते ब्राझिलला आणले जात आणि तेथे त्यांचा लिलाव होत असे. हा सर्व घृणास्पद इतिहास येथे देण्याचे कारण नाही, पण काही बोलके आकडे येथे देणे योग्य ठरेल. दक्षिण कॅरोलिना राज्यात १७२० साली ६४ टक्के लोक गुलाम होते. मिसिसिपी मध्ये १८१० आणि १८६० ह्या वर्षांत ५५ टक्के गुलाम होते. माणसांना गुराढोरांसारखे वागविलेले दिब्रिटो यांना आवडत नाही असे दिसते. ते म्हणतात, "या देशात आदिवासी आहेत याची जाणीव मनुवाद्यांना नव्हती. गुराढोरांच्यापेक्षा हलाखीचे जीवन त्यांना जगावे लागत आहे याची त्यांनी कधी पर्वा केली नाही." (पृ. ९) ज्यांच्या श्रमावर दक्षिण अमेरिकेतील श्रीमंती आधारलेली होती त्या काळ्या आफ्रिकन गुलामांचा दर्जा गुराढोरांच्या दर्जासारखाच होता, आणि त्यांचा व्यापार करणारे आणि त्यांचे धनी असलेले लोक ख्रिस्ती होते. त्यांना मनुवादी म्हणजे दिब्रिटो यांना कठीण जाईल.

अनुक्रमणिका

तेव्हा, ख्रिस्ती आध्यात्मिकतेवर मानवी समतेचे मूल्य आधारिता येईल असे म्हणणे ही एक गोष्ट आहे; आणि ख्रिस्ती धर्मसंस्थांचे आणि ख्रिस्ती धर्मानुयायांचे आचरण समताधिष्ठित आहे असा दावा करणे ही वेगळीच गोष्ट आहे. सर्व धर्मांत 'मनुवादी' आहेत. इस्लाम आणि ख्रिस्ती धर्म हे दोन्ही गुलामगिरीला मान्यता देतात. इस्लामची गुलामांकडे पाहण्याची दृष्टी अधिक उदार होती. सहा वर्षांच्या काळानंतर गुलामाची साधारणपणे मुक्तता होत असे. *नवीन करारा*त ह्या स्वरूपाची सवलत नाही. चर्चचा धार्मिक कायदा (चर्च लॉ) गुलामगिरीचे प्रामाण्य स्वीकारतो. ख्रिस्ती धर्म समतावादी आहे असे जो म्हणतो त्याला बायबल आणि ख्रिस्ती परंपरा यांचे ज्ञान नाही असे म्हणावे लागेल. ज्ञान असेल तर, ते म्हणणे अप्रामाणिक आहे असे म्हणावे लागेल.

दिब्रिटो पसंतीदर्शक सुरात म्हणतात, "अमेरिकेने निग्रोंना हक्क बहाल केले आहेत आणि रेड इन्डियन्ससाठी अजूनही 'राखीव जागा' ठेवल्या आहेत." (पृ. ९). लिंकनने १८६३ साली गुलामगिरीची पद्धत रद्द केली ही गोष्ट खरी आहे. (हा एक गांधीवादी निघाला किंवा खरा ख्रिस्ती निघाला.) पण आज सव्वाशे वर्षांनंतरही निग्रोंची सामाजिक, आर्थिक व सांस्कृतिक अवस्था काय आहे हे जगाला माहीत आहे. अमेरिकन इन्डियन्सना ('रेड इन्डियन्स'ना) ख्रिस्ती युरोपीय लोकांनी ज्या क्रौर्याने वागविले त्याचे ज्ञान दिब्रिटो यांना नाही काय? १८३० मध्ये 'इन्डियन रिमूव्हल ॲक्ट' – इन्डियन्स परंपरेने ज्या प्रदेशांत रहात होते तेथून सक्तीने त्यांचे स्थलांतर करणारा कायदा – अंमलात आला. १८४८ मध्ये जेव्हा कॅलिफोर्निआत सोन्याचा शोध लागला तेव्हा, इन्डियन्सचा त्यांच्या परंपरागत जमिनीवरील हक्क नाकारण्यात आला, अनेक भयानक युद्धे झाली व इन्डियन्सच्या कत्तली करण्यात आल्या. डॉज जनरल ॲलॉटमेन्ट कायद्यानुसार (१८८७) इन्डियन्सच्या एक लक्ष चौतीस हजार चारशे चौरस मैल एवढ्या क्षेत्रफळाच्या जमिनी त्यांच्यापासून हिरावून घेण्यात आल्या. ह्या वर्षी त्यांना 'राखीव प्रदेशा'त, ('रिझर्व्हेशन्स') डांबून टाकण्यात आले. १८५३ मध्ये कॅलिफोर्निआत एक लक्ष इन्डियन्स होते, १८६४ मध्ये ३०,००० उरले आणि १९०६ मध्ये १९००० राहिले. 'चांगला इन्डियन म्हणजे मेलेला इन्डियन' अशी म्हण प्रचारात आली. ह्या सर्व प्रकाराची जर दिब्रिटो प्रशंसा करीत असतील तर मग मनुवादी (किंवा इन्क्विझिशनवादी) शोधण्यासाठी त्यांना हिंदू समाजाकडे लक्ष केंद्रित करायला नको, किंवा स्वतःपासून फार दूर जायला नको, असे म्हणणे रास्त ठरेल.

दिब्रिटो यांना फॅसिस्ट प्रवृत्तीचे वावडे आहे असे दिसते. ही अर्थात् चांगली गोष्ट आहे. ते म्हणतात, "फॅसिस्ट प्रवृत्तीचा निवडीच्या स्वातंत्र्याला विरोध असतो. त्यांना एका विचार-प्रणालीचा, एका धर्माचा, एका राजकीय विचारसरणीचा समाज हवा असतो. निराळा विचार हा विद्रोह मानला जातो. अशा विद्रोहाचा विनाश करणे हा मग फॅसिस्टचा एक कलमी कार्यक्रम ठरतो." (पृ. ६ उद्धरण मूळाप्रमाणे.) आता, फॅसिस्टांचा मेरूमणी म्हणजे बेनिटो मुसोलिनी. पोप ११ वे पायस यांनी मुसोलिनीशी १९२९ मध्ये करार केला (लेटरन करार). ह्या करारान्वये व्हॅटिकन सिटी हे स्वतंत्र राज्य म्हणून मान्य करण्यात आले. उलट पोपने इटलीच्या राज्याला मान्यता दिली. करारात इतर अनेक कलमे होती. पण आपल्या दृष्टीने कुतूहलजनक कलम असे होते की, रोमन कॅथलिक पंथ हा इटलीचा एकमेव धर्म म्हणून स्वीकारण्यात आला. (येथे हे ही नमूद केले पाहिजे की पुढे पोप पायस यांचे मुसोलिनीशी बिनसले आणि दुसरी गोष्ट म्हणजे १९८५ च्या काँकार्दातप्रमाणे रोमन कॅथलिक पंथ हा इटलीचा एकमेव धर्म राहिला नाही.) लक्षात घ्यायची गोष्ट अशी की चर्चचा फॅसिझमला १९२९ पर्यंत तत्त्वतः विरोध नव्हता. आणि इटलीतील लोकांना धर्माची निवड करण्याचे स्वातंत्र्य १९८५ साली चर्चने बहाल केले. आता एखाद्या नाठाळ माणसाच्या मनात जर असे आले की, जोपर्यंत फॅसिस्ट राजवटीशी जुळवून घेता येते तोपर्यंत ती ठीक असते आणि जोपर्यंत रोमन कॅथलिक पंथ लोकांवर लादता येतो तोपर्यंत (त्यांच्या आत्म्यांच्या चिरंतन कल्याणासाठी) तो लादणे योग्य असते असा चर्चचा एकंदर अभिप्राय दिसतो, तर त्याला आपण काय म्हणू?

– ९ –

दिब्रिटो म्हणतात, "कॅथलिक ख्रिस्तसभा आपल्या अधिकृत शिकवणीत म्हणते, 'कुणावरही ख्रिस्ती धर्म स्वीकाराची सक्ती केली जाऊ नये. श्रद्धास्वीकार स्वभावतःच एक नियुक्त (?) कृती आहे.' (The act of faith is of its very nature a free act.)" (प्रश्नचिन्ह माझे.) दक्षिण अमेरिकेतील पोर्च्युगीज व स्पॅनिश साम्राज्यांत, गोव्यात रोमन कॅथलिक पंथाचा जो प्रसार झाला तो लोकांनी स्वेच्छेने त्याचा स्वीकार

अनुक्रमणिका

झाला म्हणून झाला असे दिव्रिटो यांचे म्हणणे आहे का? चर्चचा सिद्धान्त काय आहे आणि चर्चचे आचरण काय आहे?

मी एकच उदाहरण देतो. पेरूचा विजेता पिझारो ह्याने इंका ह्या त्या देशाच्या सम्राटाला भेटीसाठी बोलावले. आपल्या वैभवाचे प्रदर्शन करीत इंका थाटामाटाने बऱ्याच अनुचरांसमवेत पिझारोला भेटायला गेला. पिझारोने आपले सैन्य, तोफा आणि बंदुकांसह, हल्ल्यासाठी तयार ठेवले होते. फा. व्हिन्सेन्ट व्हालवर्दे ह्या धर्मगुरूने इंकाला चर्चच्या धार्मिक तत्त्वज्ञानावर एक प्रवचन दिले, आणि शिवाय असेही सांगितले की, पोप अलेक्झांडर यांनी 'नव्या जगा'तील सर्व प्रदेश कास्तिलच्या राजाला बहाल केले असल्यामुळे इंकाने त्याचे मांडलिकत्व पत्करावे आणि तसेच त्याने ख्रिस्ती धर्म स्वीकारावा आणि पोपचे आधिपत्य स्वीकारावे. हे सर्व स्पॅनिशमधून चालले असल्यामुळे बिचाऱ्या इंकाला ते नीट समजले नाही. दुभाषी होता तो कमकुवत होता आणि 'ट्रिनिटी' वगैरे गूढे त्यालाही कळली नव्हती. आपल्याला हे काही समजले नाही हे इंकाने सांगितले. आपला स्वतःचा धर्म काय आहे हेही स्पष्ट केले, आणि तुम्ही ज्या अनेक गोष्टी सांगितल्या त्या तुम्हाला कशा कळल्या असे त्या धर्मगुरूला विचारले. व्हालवर्देने त्याला बायबलची एक प्रत दिली आणि ह्या पुस्तकात हे सर्व आहे असे त्याला म्हटले. 'हे पुस्तक मला काही सांगत नाही' असे म्हणून इंकाने ते जमिनीवर फेकले. धर्मगुरू संतापला, 'ईश्वराच्या शब्दाचा अपमान झाला आहे, ख्रिश्चनांनो शस्त्रे चालवा' असे तो ओरडला. इंकाबरोबर आलेले अनुचर समारंभासाठी आले होते. त्यांची कत्तल करण्यात आली. इंकाला कैद करण्यात आले. कैदेत इंकाला समजून आले की स्पॅनिअर्ड्सना जगात सर्वात अधिक काय हवे असेल तर सोने. २२ x १६ चौरस फूट एवढ्या क्षेत्रफळाची आपली कोठडी जेथपर्यंत आपला हात पोचेल तेवढ्या उंचीपर्यंत आपण सोन्याने भरून काढू असे अभिवचन इंकाने दिले आणि त्या बदल्यात आपली सुटका व्हावी अशी मागणी केली. पिझारोने ती मान्य केली. इंकाच्या प्रजाजनांनी तेवढे सोने आणून दिले. पण पिझारोने इंकाची सुटका केली नाही. इंकावर खटला भरण्यात आला. त्याला जिवंत जाळण्याची शिक्षा फर्मावण्यात आली. व्हालवर्देने सही करून शिक्षेला मान्यता दिली. मग इंकाला सांगण्यात आले की जर त्याने ख्रिस्ती धर्म स्वीकारला तर त्याला जाळण्याऐवजी त्याचा गळा दाबून त्याला मारण्यात येईल. इंकाचे धर्मांतर झाले. इंकाने ख्रिस्ती धर्म स्वीकारला आणि त्याचा गळा दावून त्याला मारण्यात आले.

दिव्रिटो म्हणतात "धर्मांतर हा शब्दप्रयोग 'कन्व्हर्शन' ह्या इंग्रजी शब्दाचे चुकीचे भाषांतर आहे. Metanoia हा मूळ ग्रीक शब्द आहे. ख्रिस्ती परंपरेत या शब्दाला खूप गहन अर्थ आहे. त्याचा अर्थ मनःपरिवर्तन, वृत्ती आणि वागणुकीत झालेला आमूलाग्र बदल असा आहे. कन्व्हर्शन म्हणजे विकार आणि वासना यांच्यापासून दूर जाऊन, निरामयतेकडे केलेला प्रवास आहे." (पृ. ६) आता दोन प्रश्न उद्भवतात. एक प्रश्न असा की, मनुवादी हिंदूंमुळे गुराढोरांपेक्षा हलाखीचे जीवन (किंवा ख्रिस्ती देशातील गुलामांपेक्षाही हलाखीचे व अप्रतिष्ठेचे जीवन) जगणारे आदिवासी जेव्हा ख्रिस्ती मिशनऱ्यांनी केलेल्या निःस्वार्थी, प्रेमळ सेवेमुळे प्रभावित होऊन ख्रिस्ती धर्म स्वीकारतात तेव्हा त्या सर्वांचे असे मनःपरिवर्तन झालेले असते का? ते निरामयतेकडे प्रवास सुरू करतात का? दिव्रिटो यांच्या म्हणण्याप्रमाणे "कुणाही माणसाला ख्रिस्ती धर्माचा स्वीकार करायचा असेल तर त्यासाठी साधारण सहा महिन्यांचा अभ्यासक्रम पुरा करावा लागतो. त्यानंतर उमेदवारांची कसून परीक्षा घेतली जाते." (पृ. ६) हे सर्व ह्या आदिवासींच्या बाबतीत घडते का? ट्रिनिटी, पोपची अप्रमादशीलता इ. गूढ, गहन तत्त्वे त्यांना समजलेली असतात का? ख्रिस्ती झालेले आदिवासी निरामयतेच्या दिशेने प्रवास करीत आहेत असे बाह्यतः दिसत नाही.

दुसरा प्रश्न असा की, 'मेटानोइआ' ही गहन प्रक्रिया हे ख्रिस्ती धर्माचे वैशिष्ट्य आहे, इतर धर्मीयांना, उदा. हिंदूंना, त्याची यथार्थ कल्पना येणे अशक्यप्राय आहे, असे दिव्रिटो यांना सुचवायचे आहे का? हिंदू परंपरेत विरक्ती, वैराग्य, मुमुक्षत्व ह्या शब्दांनी मेटानोइआ ओळखला जातो. ज्याच्यात ही प्रक्रिया सुरू होते असा माणूस जे नित्य, शाश्वत आहे आणि जे अनित्य, अशाश्वत आहे त्यांच्यात भेद करतो, त्याला इहलोकीच्या किंवा परलोकीच्या सुखाची वासना उरत नाही, शम, दम, इ. सदगुण त्याच्या अंगी बाणलेले असतात असे शंकराचार्यांनी ह्या स्थितीचे वर्णन केले आहे. सर्वच प्रगल्भ धर्मांत मेटानोइआ ओळखण्यात आला आहे आणि जो हा आध्यात्मिक प्रवास अंगिकारतो तो सर्व लौकिक धर्मांच्या - हिंदू, इस्लाम, ख्रिस्ती, इ. - पलीकडे जातो.

**यावानर्थ उदपाने सर्वतः संप्लुतोदके।**
**तावान्सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः।।**

आध्यात्मिक वृत्तीने जगणारे जे हिंदू, मुसलमान, ख्रिस्ती, इ. असतील त्यांच्यांत परस्परात विरोध नसतात. ते एकमेकांना ओळखतात, एकमेकांचा सहप्रवासी म्हणून आदर करतात आणि सर्वसामान्य प्रापञ्चिक लोकही त्यांचा, ते कोणत्याही संप्रदातून आले असले तरी, आदर करतात. विरोध असतो तो भिन्न सांप्रदायिकांमध्ये असतो. आपला संप्रदाय सर्वश्रेष्ठ आहे, अंतिम सर्वोच्च सत्याचा मक्ता आपल्याकडे आहे असे मानणाऱ्यांमध्ये असतो. रोमन कॅथलिक चर्च असा दावा स्वतःच्या वतीने करते.

ॲथनेशिअन 'क्रीड'चा (सिद्धान्तांची संहिता) प्रारंभच असा आहे : "आपले तारण व्हावे अशी ज्याला इच्छा असेल त्याने सर्वप्रथम कॅथलिक श्रद्धा स्वीकारली पाहिजे." ("Whoever wishes to be saved must, above all, hold to the catholic faith.") संत सिप्रिअनने म्हटल्याप्रमाणे 'चर्चेच्या वाहेर तारण नाही.' ("There is no salvation apart from the Church.") ज्यांचे तारण होत नाही ते चिरकाल नरकात जातात. आपल्याकडे सत्य आहे अशी दिब्रिटो यांची खात्री आहे. तेव्हा त्यांच्या मते सर्व हिंदू संप्रदायांकडे, इस्लामी संप्रदायांकडे, इ. असत्य असणार. ते म्हणतात, "आपल्याकडे सत्य आहे अशी खात्री असली तरी सत्य सौजन्याने आणि प्रेमाने सांगायचे असते." (पृ. ८) हा आपल्या धर्मबांधवांना त्यांनी केलेला उपदेश आहे. आपला धर्म सर्वश्रेष्ठ आहे हेही त्यांनी सूचित केले आहे. "धर्म हा उपासना मार्ग आहे असे आधी सांगितले आहे. ख्रिस्ती धर्मही उपासना मार्ग आहे. परंतु, या धर्माच्या काही धारणा आहेत. त्यांच्यासाठी धर्म देव्हाऱ्यापुरता मर्यादित नाही. जो धर्म फक्त देव्हाऱ्यापुरता असतो त्याचे रूपांतर अफूच्या गोळीत व्हायला जास्त वेळ लागत नाही" (पृ. १०) ह्यात असे अभिप्रेत आहे की उदा. हिंदू धर्म देव्हाऱ्यापुरता मर्यादित आहे आणि म्हणून तो अफूची गोळी आहे. आता मार्क्स जेव्हा 'धर्म हा दडपले गेलेल्यांचा हुंदका आहे, आत्मा गमावलेल्या परिस्थितीचा आत्मा आहे, निष्ठूर जगात जतन केलेली भावना आहे, ती लोकांची अफू आहे' असे म्हणतो तेव्हा तो सर्वच धर्मांविषयी बोलत आहे पण विशेषेकरून ख्रिस्ती धर्माविषयी बोलत आहे. त्याच्या डोळ्यासमोर अतिरेकी व्यक्तिवादावर आधारलेल्या भांडवलशाहीत गुराढोरापेक्षा हलाखीचे जीवन जगणारे कामगार होते आणि त्यांच्या पलीकडे 'वसाहतीं'तील पिळले जाणारे शेतकरी आणि शेतमजूर होते. आणि मुख्य म्हणजे ह्या माणसांमध्ये परंपरेने जे जिव्हाळ्याचे मानवी संबंध नांदत होते त्यांची मोडतोड झाली होती. हे सर्व भांडवलशाही समाज ख्रिस्ती होते.

कोणताच धर्म देव्हाऱ्यापुरता मर्यादित नसतो. तो समग्र जीवनाचे नियमन करतो. जो धार्मिक माणूस आहे – मग तो हिंदू असो, ख्रिस्ती असो, मुसलमान असो – त्याच्या दृष्टीने त्याचे कोणतेच कृत्य, कोणतीही भावना, कोणताही विचार धर्मापासून अलग, धर्माच्या क्षेत्राच्या बाहेरचा असा असत नाही. 'उदरभरण नोहे जाणिजे यज्ञकर्म'. रणांगणावर धर्मयुद्ध लढत असताना सैनिक धर्म पाळीत असतो. मुलांचे संगोपन करताना आई मातृधर्म पाळीत असते.

"सेवा हा ख्रिस्ती श्रद्धेचा अविभाज्य भाग आहे. मानवाची व विशेषतः दीनदुबळ्यांची सेवा केल्याशिवाय धर्माचे पालन पूर्णपणे होऊ शकत नाही," असे दिब्रिटो म्हणतात. सेवा हा हिंदू धर्माचाही अविभाज्य भाग आहे.

**अष्टादशपुराणेषु व्यासस्य वचनद्वयम्।**
**परोपकारः पुण्याय, पापाय परपीडनम्।।**

ज्या तुकारामाचा चर्चला अलीकडे, चारशे वर्षांच्या अवधीनंतर, शोध लागला आहे, तो म्हणतो,

**जे का रंजले, गांजले, त्यांसी म्हणे जो आपुले।**
**तोचि साधू ओळखावा, *देव तेथेंचि जाणावा*।।**
(अधोरेखन माझे)

ईश्वराला प्रिय असलेला भक्त कसा असतो?

**अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च।**

मैत्रीची ही भावना, कारुण्य इ. हे केवळ आंतरिक मनोविकार नसतात. ते परोपकारात व्यक्त होतात. ह्या भावना जर परसेवेत व्यक्त झाल्या नाहीत तर त्या केवळ कृतक-भावना ठरतील.

आता हे मान्य केले पाहिजे, – नाखुषीने नव्हे तर कृतज्ञतेने आणि आदरपूर्वक – की संघटित सेवा हे ख्रिस्ती धर्माचे वैशिष्ट्य आहे. आणि अनेक मिशनऱ्यांत अभय, शुद्ध मन, आर्जव, भूतमात्राविषयीची दया, अलोलुप्त्व इ. सात्त्विक संपत्ती प्रकर्षाने आढळते. ख्रिस्ती धर्माचे हे अनुकरणीय, हृद्य वैशिष्ट्य आहे. पण मौज अशी की, जर कुणी हिंदू संस्था आदिवासी प्रदेशात अशी संघटित सेवा करू लागली की

अनुक्रमणिका

लगेच ती जातीयवादी आहे अशी टीका पुरोगामी मंडळींकडून होऊ लागते. अशा संस्थेची एक दडवून ठेवलेली कार्यक्रमपत्रिका असली पाहिजे, असे पुरोगामी लोक एकमेकांना आणि त्यांचे ऐकायला जे थांबतील त्यांना सांगू लागतात. आणि हेही म्हटले पाहिजे की, अनेकदा ख्रिस्ती मिशनरी सेवा निरिच्छ नसते. सद्धर्माचा प्रसार करण्यासाठी ती करण्यात येते. येथे कदाचित् 'पेगन' भगवद्गीतेची शिकवण प्रस्तुत ठरेल. जे दान परतफेड व्हावी म्हणून किंवा कोणत्यातरी फळाच्या आशेने करण्यात येते ते राजस असते. दानाची जो परतफेड करू शकणार नाही अशा माणसाला, ते देणे योग्य आहे एवढ्यासाठी म्हणून, जे दान देण्यात येते ते सात्त्विक असते.

**यत्तु प्रत्युपकारार्थं फलमुद्दिश्य वा पुनः।**
**दीयते.... तद्दानं राजसं स्मृतम्।।**
*(१७-२१)*

**दातव्यम् इति यद्दानं दीयतेऽनुपकारिणे।**
**.......... तद्दानं सात्त्विकं स्मृतम्।।**
*(१७-२०)*

– १० –

फ्रा. दिव्रिटो यांच्या ह्या टिपणात एखाद्याला छुपी कार्यक्रमपत्रिका दिसू शकेल. 'सेक्युलर हिंदू' त्यांना पसंत आहेत. "सेक्युलर हिंदूच अल्पसंख्य समाजाचे धर्मांध प्रवृत्तीपासून रक्षण करणार आहेत, ह्याची जाणीव अल्पसंख्याकांनीही ठेवायला हवी" असे ते म्हणतात (पृ. ७). पण हे सेक्युलर हिंदू कोण हे त्यांनी स्पष्ट केलेले नाही. बहुधा हे सेक्युलर हिंदू म्हणजे जे औपचारिकपणे हिंदू आहेत पण ज्यांचा हिंदू धर्मावर विश्वास नाही, जे विज्ञाननिष्ठ वगैरे आहेत ते असणार. हे हिंदू नाहीत पण ते ख्रिस्तीही होणार नाहीत. त्यांचा उपयोग आहे पण त्यांचा नाद सोडून दिला पाहिजे. उरले ते धार्मिक हिंदू. हे सर्वसाधारण, बहुसंख्य हिंदू आहेत. त्यांचे दोन विभाग करता येतील. एक, वर्णव्यवस्थेचे लाभार्थी, म्हणजे ब्राह्मण आणि तत्सम जाती. त्यांचे ख्रिस्तीकरण करणे कठीण आहे. दुसरा भाग म्हणजे वर्णव्यवस्थेचे बळी असलेल्या 'खालच्या' जाती. ह्यांतील बहुसंख्य अशिक्षित आहेत. तेव्हा, ख्रिस्ती धर्म समतावादी आहे, उलट हिंदू धर्माने तुम्हाला गुराढोरांसारखी वागणूक दिली आहे असा प्रचार करून त्यांना आपल्या धर्माकडे वळविता येईल; त्यांच्यात मेटानोईआची गहन प्रक्रिया सुरू करता येईल. उच्च जातींवर मनुवादी असा छाप मारला की खालच्या जाती त्यांच्यापासून आणि त्यांच्या धर्मापासून दुरावतील.

आपल्या मनात असा काही विचार नाही, हे आपल्यावर लादलेले कुभांड आहे, असे दिव्रिटो म्हणतील. असा संशय घेणे योग्य नाही हे मान्य करूया. पण ते स्वतः मनुवाद्यांविषयी "एकूण स्वातंत्र्य (Liberty) व मानवी हक्क (Human Rights) ह्या गोष्टी त्यांनी मनापासून स्वीकारल्या आहेत का?" असा संशय घेतात. मग, समजा, एखाद्याने इन्क्विझिशन-वाद्यांविरुद्ध असा संशय घेतला की, त्यांनी इतर धार्मिक समाजांचे अस्तित्व मनापासून स्वीकारलेले नाही, ह्या सर्व समाजांचे ख्रिस्तीकरण त्यांना विधिनिषेधशून्य मार्गांनी करायचे आहे तर दिव्रिटो त्याला कसा दोल लावू शकतील?

दिव्रिटो यांनी असा आव आणला आहे की चर्च म्हणजे स्वातंत्र्य आणि समता प्रस्थापित करण्यासाठी प्रयत्नांची शर्थ करणारी संघटना आहे, त्यासाठी ते शोषित जातीजमातींत शिक्षणाचा प्रसार करते. मग हे लोक संघटित होतात, आपल्या हक्कांसाठी लढू लागतात. म्हणून उच्च जातींचे हिंदू – मनुवादी – मिशनऱ्यांवर हल्ले करतात. आता असे मनुवादी सर्व धर्मांत आढळतात. फ्रान्सचे उदाहरण घेऊ. हा परंपरेने प्रामुख्याने रोमन कॅथलिक असलेला देश आहे. आधुनिक काळात १६ व्या शतकापासून ह्या देशातील शाळा व इतर विद्यालये बऱ्याच प्रमाणात जेझुइट आणि इतर ख्रिस्ती भिक्षुसंघांकडून चालविल्या जात. पण ह्या मुख्यतः उच्च वर्गातील मुलांसाठी होत्या. फ्रेंच राज्यक्रांतीनंतर १७९१ मध्ये शिक्षणाचा हक्क सर्वांना आहे असे घोषित करण्यात आले. ह्याचे श्रेय घेण्याचा मोह दिव्रिटो यांना झाला तर त्यांनी त्याच्यावर विजय मिळवावा. १८१४ मध्ये जेव्हा राजेशाहीची पुनःस्थापना झाली तेव्हा शिक्षण पुन्हा चर्चच्या नियंत्रणाखाली आले. ज्या उच्च प्राथमिक शाळा (हायर प्रायमरी स्कूल्स) स्थापन करण्यात आल्या होत्या त्या रोमन कॅथलिक कॉन्झर्व्हेटिव्ह मंडळींनी १८५० मध्ये बंद केल्या. पुढे १८७८ मध्ये तिसऱ्या रिपब्लिकने 'सक्तीचे, मोफत आणि इहवादी (सेक्युलर)' शिक्षण देण्याची योजना हाती घेतली. प्राथमिक शिक्षणाची चर्चच्या तावडीतून मुक्तता झाली. इंग्लंड हेही ख्रिस्ती राष्ट्र व राज्य होते. तेथेही १८८० मध्ये प्राथमिक शिक्षण सक्तीचे करण्यात आले आणि १८९१ मध्ये ते मोफत झाले. ख्रिस्ती समाजांना शिक्षणाचे सार्वत्रिकीकरण करायला १८ शतके कां लागली? सर्वच पारंपरिक समाजांत






– युरोपीय ख्रिस्ती समाज धरून – शिक्षण अभिजनांपुरते मर्यादित होते. सार्वत्रिक साक्षरता ही आधुनिक औद्योगिक समाजाची गरज आहे आणि जेथे असे समाज विकसित झाले तेथे परिस्थितीच्या रेट्यामुळे शिक्षणाचे सार्वत्रिकीकरण झाले आहे. एखाद्या देशात सामाजिक क्रांतीसाठी रोमन चर्चने शिक्षणाचा प्रसार केला असे एकही उदाहरण नाही. अलीकडे काही लॅटिन अमेरिकन देशांत रोमन चर्चच्या काही धर्मगुरूंनी असीम धैर्याने पीडित जनतेच्या वतीने हुकूमशहांविरुद्ध आवाज उठविला आणि असे करताना प्राणांचे बलिदान केले. हे ख्रिस्ताचे सच्चे अनुयायी होते. पण हे सन्मान्य अपवाद होत. एकंदरीत रोमन चर्च हे नवव्या शतकापासून तरी प्रस्थापित सत्ताधाऱ्यांचा घटक म्हणून नांदत आले आहे, किंवा सत्ताधाऱ्यांशी जुळवून घेण्याचा प्रयत्न करीत आले आहे.

दिब्रिटो म्हणू शकतील की व्हॅटिकन २ (१९६२-६५) पासून हे चित्र बदललेले आहे. चर्चने धार्मिक स्वातंत्र्य मान्य केले आहे आणि इतर धर्मांचे मर्यादित प्रामाण्य मान्य केले आहे. हे बदल कितपत दिखाऊ आहेत आणि कितपत मनोभूमिकेतील बदल आहेत हे काळच दाखवून देईल. पण असे बदल करण्यात येतात ह्याचा अर्थ असा की कॅथलिक धर्मपंथाचे परिष्करण होत असते. मग हिंदूंना आपल्या धर्माचे परिष्करण करण्याचा अधिकार ते कां नाकारतात? हिंदू धार्मिकतेचे उदाहरण म्हणून ते मनूचा का निर्देश करतात? श्री रामकृष्ण परमहंस, रमण महर्षी, गांधी-विनोबा ह्यांची शिकवण काय आहे आणि आचरण कसे होते हे ते कां सांगत नाहीत? हे सेक्युलर हिंदू होते का?

आपल्या टिपणाला जोडलेल्या प्रास्ताविकात ते म्हणतात, "धर्मांतराविषयी खूप चर्चा होत आहे. ह्या निमित्ताने मंथन होत आहे. अमृताबरोबर विषही बाहेर येत आहे..." त्यांच्या टिपणातून कालकूट पाझरते आहे हे त्यांना दिसत नाही.

– ११ –

मला ख्रिस्ती धार्मिक-आध्यात्मिक परंपरेविषयी मनापासून आदर आहे. सर्वच धार्मिक परंपरा पुरोहितांचा स्वार्थ, सामान्य लोकांविषयी अनास्था, अन्यायी समाजरचनेशी जुळवून घेण्याची आणि तिचा लाभ घेण्याची वृत्ती, इ. मानवी स्खलनांनी आणि दोषांनी डागळलेल्या आहेत आणि ख्रिस्ती परंपराही अशीच आहे. पण धार्मिक परंपरेच्या गाभ्याशी मानवी प्रकृती आणि माणसाचे कल्याण याविषयीचे जे उत्कट, गहन दर्शन असते त्याच्या प्रकाशात ह्या परंपरांचे वारंवार परिष्करण होत असते. ह्या भिन्न परंपरांत देवाणघेवाण होऊन त्या सर्व समृद्ध होत असतात. रोमन साम्राज्याचे विघटन झाल्यानंतर ख्रिस्ती धर्माने विशेषतः युरोपमध्ये संस्कृतीचे रक्षण आणि संवर्धन केले. प्राचीन ग्रीक संस्कृतीचा वारसा पुढच्या पिढ्यांत संक्रांत केला. 'चॅरिटी' हे एक खास ख्रिस्ती मूल्य आहे. दुसऱ्याच्या गरजा ओळखून त्यांचे समाधान करण्याचा सर्वतोपरी प्रयत्न करणे म्हणजे चॅरिटी. दुसरा जर आपल्याशी आततायीपणे वागत असेल तर तीही त्याची, विकृत का होईना, गरज असते हे जाणून विचलित न होण्यात, शांती ढळू न देण्यात, चॅरिटी असते. ('अविंध' परतपरत अंगावर थुंकला तरी शांतपणे परतपरत स्नान करणाऱ्या एकनाथांनी ती दाखविली.) एखाद्या हिंदूला येशूच्या व्यक्तिमत्त्वाविषयी, शिकवणीविषयी एवढी पूज्यभावना वाटेल की तो ख्रिस्ती धर्म स्वीकारीलही. किंवा हिंदू राहून येशूचे इष्टदेवता म्हणून ध्यान करील. त्याने कोणताही मार्ग पत्करला तरी काही बिघडत नाही. 'नृणाम् एको गम्यस्त्वमसि पयसाम् अर्णव इव'. बखेडे होतात ते धर्माचे राजकारण करण्यामुळे. आपण असे करीत तर नाही ना, असा विचार दिब्रिटो यांनी करावा अशी विनंती आहे.

**परिशिष्ट**

मनुस्मृतीप्रमाणे शूद्राचे दास्य (गुलाम ही स्थिती) 'निसर्गज' आहे, ते त्याच्यापासून अलग करता येत नाही. म्हणजे शूद्र सदैव दास राहतो.

**न स्वामिना निसृष्टोऽपि शूद्रो दास्यात् विमुच्यते।**
**निसर्गजं हि तत् तस्य, कस्तस्मात्तद् अपोहति।।**
*(८-४१४)*

पण ह्यावर भाष्य करताना मेधातिथि म्हणतो, "त्याचे (शूद्राचे) दास्य स्वाभाविक नाही, त्याला धर्माची (पुण्यप्राप्तीची) इच्छा असेल तर तो दास्य पत्करील. विकत घेतलेला दास, घरी जन्मलेला दास (दासीपुत्र) यांच्याप्रमाणे शूद्राची विक्री करता येत नाही किंवा दुसऱ्याकडे गहाण म्हणून त्याला ठेवता येत नाही. त्याचे दास्य नित्य नाही. विशिष्ट फलाची (पुण्य) इच्छा करीत असल्यामुळे त्याने ते स्वीकारलेले असते. त्याची इच्छा नसेल तर त्याला दास्य नसते. म्हणून एखादा संपन्न शूद्र जर, ब्राह्मण इत्यादिकांचा आश्रित म्हणून न रहाता, स्वातंत्र्याने








जगला तर त्याला दोष लागत नाही." ("न तस्य औत्पत्तिक दासत्वम्, इच्छाधीनत्वाद् धर्मार्थिनः न हि तस्य दानाधानक्रिया युज्यते क्रीतगृहजादिदासवत्। न तस्य नित्यं दास्यं किं तर्हि फलविशेषार्थिनः ततश्च अनिच्छतः न दास्यम् अस्ति। अतः यदि शूद्रो विद्यमानधनः स्वातंत्र्येण जीवेत् ब्राह्मणाद्यनपोश्रितः न जातु दुष्येत्।")

शूद्रांना ज्ञानापासून वंचित ठेवण्यात आले होते अशी तक्रार अनेकदा करण्यात येते. 'न शूद्राय मतिं दद्यात्' ह्या स्वरूपाची वचने तिच्या समर्थनार्थ करण्यात येतात. या संबंधात काही गोष्टी ध्यानात घेणे आवश्यक आहे. एक अशी की, शूद्रांविषयी प्रारंभी जी वैरभावना आढळून येत होती ती हळूहळू मावळत गेलेली आढळते. चातुर्वर्ण्याच्या चौकटीत एका समाजात त्यांना खालच्या पातळीवर सामावून घेतले गेले. चातुर्वर्ण्य किंवा जातिव्यवस्था समताधिष्ठित होती किंवा न्याय्य होती असा कुणाचाच दावा असणार नाही. आता, शूद्रांना ज्या ज्ञानापासून धर्मव्यवस्थेप्रमाणे वंचित ठेवण्यात आले होते ते वेदांचे किंवा श्रुतीचे ज्ञान होते. लौकिक ज्ञान – म्हणजे इतिहास-पुराणांचे ज्ञान, कलाकारागिरीचे ज्ञान – त्यांना खुले होते. शंकराचार्यांनी म्हटल्याप्रमाणे इतिहास-पुराणांच्या ज्ञानाचा चारही वर्णांना अधिकार आहे असे स्मृतिवचन आहे; 'श्रावयेच्चतुरो वर्णान्'. जे वेगवेगळे शिल्पी, कारागीर होते त्यांना त्या, त्या शिल्पाचे शिक्षण देणाऱ्या शाळा होत्या आणि आचार्य आणि विद्यार्थी यांनी परस्परांशी कसे आचरण करावे याविषयीचे नियम होते. उदा.

**स्वशिल्पमिइच्छन्नाहर्तुं बान्धवानामनुज्ञया।**
**आचार्यस्य वसेदन्ते कालं कृत्वा सुनिश्चितम्।।**
**आचार्यः शिक्षयेदेनं स्वगृहे दत्तभोजनम्।**
**नचान्यत्कारयेत्कर्म पुत्रवच्चैनमाचरेत्।।**

*(नारदसंहिता ६-१५-१६)*

**एवं च अन्तेवासिना कङ्कणादिकर्मफलार्पण मात्रेण गुरुशुश्रूषा कार्या।** – *स्मृतिचन्द्रिका*

(ह्याचा सारांश असा की आपले शिल्प शिकण्याची इच्छा असलेल्या शिष्याने आपल्या वडीलधाऱ्या नातलगांच्या अनुमतीने, आचार्यांच्या घरी राहावे, याचा काळ निश्चित करावा. आचार्यांने त्याला शिकवावे, स्वतःच्या घरी भोजन द्यावे. आचार्यांने शिष्याकडून दुसरी कामे करून घेऊ नयेत. त्याच्याशी तो आपला मुलगा असल्यासारखे वागावे. (शिल्प शिकत असतांना शिष्य ज्या वस्तू निर्माण करील त्या गुरूला अर्पण करून त्याची सेवा करावी.)

सर्व मुलामुलांना प्राथमिक-माध्यमिक शिक्षण देण्यासाठी एक सर्वसमावेशक व्यवस्था असावी ही आधुनिक रचना आहे. ही एकोणिसाव्या शतकात सुरू झाली.

मनुवादी स्त्रियांना स्वातंत्र्य नाकारतात ही खरी गोष्ट आहे. 'न स्त्री स्वातंत्र्यम् अर्हति' इ. पण बायबल सांगते, "पत्नींनो, तुम्ही आपापल्या यजमानांचे आधिपत्य स्वीकारा (सबमिट) जसे तुम्ही प्रभूचे (लॉर्ड) आधिपत्य स्वीकारता. कारण नवरा हा पत्नीचा प्रमुख (हेड) असतो, जसा ख्रिस्त चर्चचा प्रमुख आहे आणि तो (त्या) शरीराचा तारक (सेव्हियर) आहे. त्यामुळे चर्च जसे ख्रिस्ताच्या अधीन आहे त्याप्रमाणे स्त्रियांनी सर्व बाबतीत आपल्या यजमानाच्या अधीन असावे." (इफिशियन्स ५-२२, २३, २४) हा संत पॉलचा आदेश आहे.

स्त्रियांना मानवी व्यक्ती म्हणून सर्व बाबतीत स्वातंत्र्य असले पाहिजे हे आधुनिक नैतिक मूल्य आहे, ख्रिस्ती नव्हे.














एकांकिका

# ऐकली गीता घोड्यांनी

विश्वनाथ खैरे

[पडद्याच्या आत मेंढरांचे वेवेचे, कुत्री भुंकण्याचे, घोड्यांच्या खिंकाळण्याचे व एकमेकांच्या मागे धावण्याचे, धनगरणींनी पोरांना धपाटे घालीत कातवल्याचे आवाज येतात. नंतर चारदोन माणसं वोलत चालल्याचा आवाज.

'काय खंडुबा, कुनीकडं हिकडं?'

'कोकनात नव्हं का जायचं बकरी घिउन हिवाळ्यात.'

'जागा वदालली आउंदा? अगदी देवळाच्या मागंच यिउन राहिलात ती.'

'पूर्वापारच्या जाग्याव पाझरतलाव नाय का झाला. ही जागा वरी हाये निपाळीची. कुनिकडं निघालात येरवाळी?'

'देवळात चाललोय. पुरान चालतंय दोन महिनं.'

'एक जागी राहनाराचं बरं असतं. आम्हांला कुठं काय देवाधर्माचं ऐकायसवराय मिळतंय.'

'गुंधूळ घालताच की.'

'ती काय तुमच्यावानि हाये का? पोरंसोरं करत्यात कायनूबायनू. आउंदाच्याला काय घोडी नाचवायचाच नाद धरलाय.'

'बाबुराव, चला. नका हितंच गप्पा मारीत बसू.'

'चला. वरंय खंडवा, या लौकर माघारी.'

अरंगाच्या (रंगमंचाच्या) मध्यावर पडद्यापासून जवनिकेच्या एकतृतीयांश अंतरावर पुराणिकबुवा पाटावर बसले आहेत. त्यांच्यासमोर चौरंगावर महाभारताची पोथी आहे. बाजूला धूप जळल्याचा सुगंध आहे. बुवा पोथीच्या पानांची खालवर करतात, सुहास्य मुद्रेने समोरच्या श्रोत्यांकडे पाहतात आणि आत्मविश्वासपूर्वक आख्यानाची सुरवात करतात.]

**पुराणिक** (डोळे मिटून, छातीशी हात जोडून) : मूकं करोति वाचालं पंगुं लंघयते गिरिम्। यत्कृपा तमहं वन्दे परमानंदमाधवम्। ओऽम् नमो भगवते वासुदेवाय। मूका करी जी वाचाळ लांघवी गिरि पांगुळ। कृपा ज्याची तया वन्दे परमानंदमाधवा। त्या श्रीकृष्ण भगवंताच्या कृपेने येथवर मजल गाठली. त्याच्याच कृपेने हे महाभारताचे आख्यान आपण पुरे करणार आहोत. महाभारताची कथा म्हणजे भगवान श्रीकृष्णाच्या गोकुळातल्या गाईच्या गोरसासारखी. पहिल्या धारेपासून रुचकर, मधुर, पुष्टी तुष्टी आणि शांती देणारी, तरी गोरसाच्यासुद्धा नाना परी असतातच ना. निरसे दूध, भाकरीसारखी साय आलेले चुलीवरचे दूध, घट्ट झालेले वड्या पाडण्यासारखे दही, ते घुसळून काढलेले पांढरेशुभ्र लोणी. जाऊदे. कुणीकुणी मंडळी त्या गोरसाच्याच चिंतनात रंगून गेली तर... महाभारताचं नवनीत म्हणता येईल असं जे आजचं आख्यान लावायचं आहे त्याला ती मुकतील.

तर, काल आपण ऐकलं की आंधळ्या धृतराष्ट्राची इच्छा पुरवण्यासाठी भगवंतांनी संजयाला दिव्यदृष्टी देऊन त्याच्यापाशी वसवलं आणि सांगितलं की, कुरुक्षेत्रावर जे काही घडेल ते तू राजाला सांग. भगवंतांची सारी शिष्टाई फोल होऊन उभयपक्षी युद्धाची तयारी झाली, भगवंतांनी पांडवांचा पक्ष घेतला आणि, शस्त्र हाती न धरण्याच्या अटीवर, स्वतः भगवंत अर्जुनाच्या रथाचे सारथी झाले. अहो, केवढं भाग्य अर्जुनाचं की प्रत्यक्ष परमेश्वराचा अवतार त्याचा सारथी झाला.

पण विचार करा, मला पामराला वाटत आलं आहे की, अर्जुनापेक्षासुद्धा यःकश्चित प्राणियोनीतले त्याचे घोडे अधिक भाग्यवान होते. (अरंगाच्या दोन्ही पाखांतून [विंगांमधून] घोड्यांच्या टापांचा आवाज येतो.) अहो, ज्यांच्या कपाळी हलक्या जातीतल्या सूतांचे फटके खाण्याचं लिहिलेलं होतं, (घोड्यांच्या खिंकाळण्याचा आवाज).... त्यांच्या पाठीवर रोज रात्री भगवंतांचा हात फिरावा.... काय ही लीला! चौऱ्याऐंशी लक्ष योनीत हिंडून मानवयोनीत जन्म घ्यायचा, तप, साधना, भक्ती करायची अन् मऽग कुठं मुक्तीची वाट बघायची.... त्याऐवजी नीचयोनीत जन्म घेऊन खुद्द भगवंताकडून सेवा घ्यायची याला केवढं भाग्य लागलं असेल! (घोड्यांच्या प्रेमालापांचा आवाज).... मला कुणी निवड करायला दिली तर मी म्हणेन परमेश्वराच्या आधी त्या परम भाग्यवंत अश्वांचे दर्शन मला अभाग्याला व्हावे.

अनुक्रमणिका






(दोन्ही पाखांतून दोनदोन घोडे टाप टाप धावत येतात आणि पुराणिकाच्या दोन वाजूंना उभे राहतात. पुराणिकाची धांदल उडते. हे काय झालं त्याला कळत नाही. तो पळून जायला पाहतो, तर दोन्ही वाजूंनी एक एक घोडा आपलं तोंड त्याच्या मागं नेऊन त्याला अडवतो. पुराणिकाच्या डाव्या वाजूचा घोडा प्रेमानं आपली हनुवटी त्याच्या मानेवर घासायला लागतो. उजव्या वाजूचा घोडा जुळलेले दात उघडे करून आनंदाचे आवाज करतो. पुराणिक मात्र लटलट कापत आहे. तेवढ्यात, पुढे असलेल्या दोघांपैकी उजव्या वाजूचा घोडा वोलू लागतो.)

**घोडा** : वत्सा, भिऊ नको. (पुराणिक त त प प करीत वोलायला पाहतो.) तुझं अभाग्याचं भाग्य उजळलं असताना, भित्र्या भागुवाईसारखा भागतोस कशाला?

**पुराणिक** : म्हणजे? तुम्ही..

**घोडा** : काय आम्ही?

**पुराणिक** : तुम्ही ते आहात?

**घोडा** : कोण ते?

**पुराणिक** : भगवंताचे, अर्जुनाच्या रथाचे घोडे आहात?... खरंच?

**घोडा** : 'खरंऽच?' कोणतं युग होतं त्यांचं? कलियुग?

**पुराणिक** : नाही, नाही. कलियुग अजून सुरू व्हायचं होतं.

**घोडा** : तरी आम्हांला 'खरंऽऽच' म्हणून विचारतोस?

**पुराणिक** : (एकदम लवून, अपराधाची क्षमा मागण्याचा नमस्कार करीत) नाही महाराज, विश्वास माझाच माझ्यावर वसेना.... आपल्यावर नव्हता अविश्वास दाखवायचा.... (आपल्यावरची वला लोकांवर ढकलण्यासाठी वोलतो...) ह्या जमलेल्या मंडळींना विचारा –

**घोडा** : त्यांना काय विचारा? आम्ही कोण म्हणून? (प्रेक्षकांकडे मोर्चा वळवीत) मंडळी, सत्ययुगातल्या कथा रोज तुम्हाला सांगणारे हे. यांना आम्ही ओळखू येत नाही, तर तुम्हा आयक्या मंडळींना कसे ओळखू येणार. स्वतः भगवंताने तक्रार केली होती अर्जुनाकडं की, माणसाच्या कुडीत अवतरलेल्या मला, हे भांवावलेले मानव ओळखत नाहीत. ती आम्ही त्याच्या तोंडून आमच्या कानांनी ऐकली आहे. आमचीही तीच अवस्था आहे. म्हणून आमची ओळख आम्हीच आता तुम्हांला करून देतो.

(घोडा चार पावलं पुढं येऊन प्रेक्षकांच्या समोर उभा राहतो. त्याच्या जवळचा दुसरा घोडा पटकन त्याच्याच प्रमाणे उभा राहतो. पुराणिकाच्या वाजूचे दोघे घोडेही त्यांच्या मागेच उभे होतात. कवायतीच्या शिस्तीनं सारी रचना होते. चारीजण रथाच्या जुवांना जोडल्यासारखे दिसतात. पुराणिक आपलं उपरणं सावरीत सुटकेच्या वरोवरच कुतूहलाच्या मुद्रेने काहीशा सुरक्षित अंतरावर उभा राहतो. डाव्या वाजूचा घोडा पुन्हा वोलू लागतो.)

**घोडा** : तर आम्ही चौघे भगवंताचे घोडे. अर्जुनाच्या रथाचे अश्व. माझं नाव -

**पुराणिक** (महाभारताचा आपला व्यासंग दाखवतो) : वलाहक.

**घोडा** (त्याच्या चोंवडेपणाने अस्वस्थ झाल्याचे दाखवतो) : ते तुझ्यासारख्या कथेकऱ्यांनी दिलेलं नाव. आमची आम्ही दिलीघेतली काही नावं असतील की नाही?

**पुराणिक** : क्षमा करा. आपण भगवंताचे अनुग्रहीत. त्या अवस्थेतली आपली नाव ग्रंथावरून आम्हांला माहीत. पूर्वाश्रमीची नावं असतीलच.

**घोडा** : (पुराणिकाला जरा करड्या आवाजात) आमची ही नावं तशी उत्तराश्रमीचीही आहेत. (प्रेक्षकांकडे) मी काय म्हणतोय ते नंतर हळूहळू कळेल तुम्हांला. तूर्तास... एवढंच समजून घ्या.. माझं नाव... एऽक.. काय? .... (मान जराशी कलवून वाकी तिघांनाच कळेल असा इशारा करतो.)

**तीन घोडे** : एऽक.

**एक** : (प्रेक्षकांना) आलं ना ध्यानात? एऽक. (घोड्यांना) आता तुमचीपण नावं कळूद्या यांना.

**घोडा** : मी दोऽन्. (रुवावात पाय आपटीत) दन् दन् दोऽन्. (मान अजिवात न लववता झोकात आपल्या जागेवर जातो.)

**घोडा** : (सगळ्या प्रेक्षकांचा अंदाज घेत, मऊ आवाजात) मी आपला तीन. (मान तीनदा वरखाली करतो.) इन मिन, तीऽन. (अंग चोरीत मागे जातो.)

**घोडा** : (पहिल्या तिन्ही घोड्यांकडे नजर टाकीत, ताकदीने पण दवत येतो.) मला च्यार म्हनत्यात. (आपलं काही चुकलं नाही ना, याची चाचपणी तिघांकडून करीत मागे जातो.)

**पुराणिक** : (मागे जाणाऱ्या चार ला) च्यार म्हणजे चार नाव ना तुमचं?

**एक** : (पुराणिकाकडं त्रासिकपणं पाहतो.) भगवंतांनी



अनुक्रमणिका

आम्हांला एकत्र आणलं. मी द्वारकेचा. मथुरेहून आलेल्या गौळवाड्यात माझे आईवडील मरेपर्यंत राहिले. मला सांदीपनींच्या आश्रमात काही वर्षं ठेवलं होतं. तिथं माझ्यावर जे संस्कार झाले त्यांच्यामुळं मला एक हे नाव मिळालं.

**दोन** : आमचं घराणं गांधारातलं. महाराणी गांधारींच्या स्त्रीधनात मी आलो. माझा बांधा आणि शक्ती पाहून अर्जुनानं मला स्वताकडं घेतलं. अर्जुनाची शिकार माझ्यावाचून व्हायची नाही. पुढं मग श्रीकृष्णानं रथाची धुरा माझ्या खांद्यावर दिली. गवताळ कुरणात चरायला जाण्यापेक्षा रक्ताळ रणात लढायला जाण्याचा आनंद, अधिक व्हायचा मला. (एक च्या बरोबरीनं रांगेत उभा राहतो.)

**तीन** : चेदि देशाचे नगरशेट गडगंज मालाचे तांडे दाही दिशांना पाठवीत. त्यांच्याबरोबर शिंगरू असताना मी फिरलो. एकदा हस्तिनापुराला आलो असताना नकुलदेवांच्या मनात मी भरलो. हवं तेवढं द्रव्य घ्या पण याला मला द्या, असा त्यांनी व्यवहार केल्यामुळं मी पांडवांच्या पागेत शिरलो. (दोन च्या पलीकडे थोडी जागा सोडून उभा राहतो.)

**चार** : सुतांची जात मंजे रथ चालवनारांची. त्यांच्यातल्या येकानि बाला न् आईला पाळल्यालं. मला वळान तसं चांगलं लावल्यालं. पन सूतवाड्यात मन रमाना. पहाटऽच यकदिशि पळालु. भीमदादांनी कानाला धरून पागऽला बांधलं. जुवाला खांदा लावला की यकटाच रथ वढायचो. त्याच्या ह्यानि किस्नातानि पुठ्ठ्यावर थाप मारली. (तीनपासून बऱ्यापैकी जागा सोडून पाय चाळवीत उभा राहतो.)

**एक** : पुराणिक, पटली ना सगळ्यांची ओळख? (पुराणिक संमतीची मान हलवतो.) तर मग करा तुमच्या आख्यानाला सुरवात. मघाशी अर्जुनाच्या घोड्यांचं पाघळून वर्णन केलंत. ते ऐकलं म्हणून आत आलो आम्ही. तुमची काही अडचण होऊन देणार नाही. (त्याला वाट देण्यासाठी घोडे पांगतात.)

**पुराणिक** : (पाटाकडे जात नाही.) नको, बसायला नको. आपल्यासारख्यांच्या समोर पाटावर बसायचा उद्धटपणा मी करणार नाही. उभ्यानंच आख्यान लावतो. पुराणाचं कीर्तन होईल, अधिक काही नाही. अन् पुढं पोथी असायचीही गरज नाही.

**दोन** : पोथी समोर असली तरी तुम्ही मनचं पण काहीही जोडताच की. श्रीकृष्णाच्या घोड्यांचं नाहीका, कुठं काय लिहिलंय पुराणात?

**पुराणिक** : (ओशाळवाणं हसतो.) लोकांना देवभक्तीला लावावं म्हणून सांगावं लागतं काही काही. (खालच्या आवाजात) अन् दुसऱ्या कथेकऱ्यांच्या वऽर कडी करावी लागते कधीमधी.

**एक** : उभ्यानं तर उभ्यानं. चला करा सुरवात.

(चारी घोडे पुन्हा रथाला जोडल्यासारखे, अरंगाच्या कर्णरेपेवर उभे राहतात. पुराणिक उपरणं ठाकठीक करून त्याच्या पदरानं तोंड पुसून सुरवात करायला पाहतो.)

**पुराणिक** : (मघाचा आत्मविश्वास हरवलेला. काही अस्फुट पुटपुटत घोड्यांकडेच नमस्कार करतो.) देवा, चुकत माकत सांगेन, ऐकून घ्यावे. वेडेवाकडे बोलेन, गोड करून घ्यावे.

**तीन** : आम्ही कसले देव बोऽ. किशनदेवाचे झालं तरी घोडेच –

**पुराणिक** : (दोन्ही गालांवर चापट्या मारून घेत) नाही नाही देवा! देवाचे भक्त –

**चार** : (तीन जवळ पुटपुटतो) भक्तऽ? फटक्यांचे धनी फक्तऽ!

**पुराणिक** : (घोड्यांकडून प्रेक्षकांकडे वळत, हात हवेत फिरवतो. आता त्याचा स्थायी भाव जागेवर येऊ लागतो.) तर, महाराजा, जेहेत्ते कालाचे ठायी, दोन्ही डोळ्यांनी आंधळा, राजा धृतराष्ट्र संजयाला म्हणाला, बोल, काय झालं कुरुक्षेत्रावर. मंडळी, संजय मोठा चतुर होता. राजाला काय ऐकावंसं वाटतंय त्याला माहीत होतं. त्याच्या लेकांच्या बाजूची मोठी मोठी नावं त्यानं धडाक्यानं सांगितली. भीष्म, द्रोण, कर्ण, कृप...

**दोन** : अश्वत्थामा सांगा. अश्वाच्या ताकतीचा माणूस...

**एक** : ब्राह्मणपुत्र असून.

**चार** : घोड्यांच्या घराण्याचं नाव क्येलं. (खाटकन टाप वाजवतो.)

(पुराणिकाला अशा विक्षेपांची सवय नाही. त्याची चुळबूळ होते. पण तेवढ्यात, आलिया भोगासी सादर होऊन तो मोहरा बदलतो.)

**पुराणिक** : देवा, असंच चुकलं माकलं सुधारून द्या... संजय म्हणाला, राजा, भीष्म आजोबांनी सिंहासारख्या आवाजाचा शंख फुंकला... ततः श्वेतैर् हयैर् युक्ते महति स्यंदने स्थितौ– नंतर पांढऱ्याशुभ्र चार (घोड्यांकडे हात दाखवतो) घोड्यांच्या रथात बसून...

**एक** : आम्ही, आम्हीच होतो त्या रथाला. पांढरे शुभ्र चौघेजण. (त्याचे डोळे चमकतात.) बघत राहायचे सारे लोक.

(चौघेही अज्ञात शक्तीनं भारल्यासारखे, रथाच्या धुरांना नेट लावल्याचा अभिनय करतात.) केवढा रथ तो, पण भिंगरीसारखा पळवायचे आम्ही.

**दोन** : आम्ही दोघं पुढे. आपोआप लोक वाट करून द्यायचे. स्वतः श्रीकृष्णानं तुरे खोवलेले असायचे आमच्या डोक्यात... अन ते तुरे हिंदकळायचे आमच्या चालीनं.

**तीन** : बहुतेक भार पेलायचे आम्ही दोघे, मागची धुरा आमची. तराजूच्या दांडीसारखी सरळ. तिला खांदा देऊन दोनदोन कोस धावलो तरी खूर भुईला टेकायचा नाही. चार घोडे, दोन वीर, एक रथ, सातजण एक होऊन जायचे.

**चार** : अन् रथावरला मारुती? (पुराणिक चारच्या आठवणीचं कौतुक करतो.) त्यो आठवा. त्यालावि आठवा. आम्हांला कुठंवि पाठवा, घुमाट रथ न्यायाचो. लगाम मंजी तोंडातला दागिना. कासऱ्याची वादी अंगाला लागिना. कधीतरी बसला किस्नाताचा फटका, की दिलाच वधा रथाला झटका...

(पुराणिकही या आठवांच्या धारेत वाहवून हाताने रथ चालल्याचे दाखवीत आहे. एक-दोन-तीन-चारांची चाल धाव होते आणि हळूहळू मंद होऊ लागते. पुराणिकाला पोथीतला कथाभाग आता सलगपणे सांगणं कठीण व्हायला लागलंय. घोड्यांची चाल कमी होताना पाहून तो प्रेक्षकांकडे वळतो.)

**पुराणिक** : जेहेत्ते कालाचे ठायी, तो महावीर अर्जुन रथात आहे, खांद्यात ते प्रचंड टणत्कार करणारे गांडीव धनुष्य आहे, पाठीवर अक्षय बाणांचा भाता आहे, छाती फुगली आहे, दंड फुरफुरताहेत – असा तो अर्जुन आपल्या सारथ्याला म्हणजे प्रत्यक्ष भगवंताला सांगतो आहे, कृष्णा, रे अच्युता, (चालीवर) दोन्ही सैन्यांमध्ये माझा रथ नेऊनि थांबव! (थांवव शब्द ऐकताच चारी घोडे एकदम थांवतात. पुराणिक खूप होतो.) आणि (घोड्यांकडे हात करून) यांचा तो रथ भगवंतांनी दोन्ही सैन्यांच्या मधे थांववला.. आणि अर्जुनाला म्हणाले... वघून घे हे सारे कौरव, जमा झालेले लढायला. अर्जुन ताडकन उभा राहिला, एकच नजर त्या सेनेवर टाकली, आणि त्या अठरा अक्षौहिणी सैन्यात त्याला दिसले... वडीलधारे, सोयरेधायरे, आजे–नातू, मामे–काके, गुरू–सखे.

**तीन** : नाही दिसले त्याला... जे दिसले आम्हांला... (पुराणिक धक्का बसल्यासारखा थांवतो.) वडीलधारे आमचे, मामे–काके–सखे.... अकरा लक्ष ऐंशी हजार नऊशे ऐंशी फक्त...

**पुराणिक** : (काय वोलावं हे न समजून) मी नाही समजलो....

**एक** : (तीनकडे तिरप्या नजरेने पाहत) समजेल हळूहळू. चालूद्या तुमचं.

**तीन** : हो, चालूद्या.

**पुराणिक** : (चेहरा जरासा उतरलेला) आणि ते सारे पाहून अर्जुनाचा गळाठा झाला.. तोंडाला कोरड, अंगाला घाम, गळाले धनुष्य... म्हणतो, (रडक्या आवाजात) कृष्णा, कसे रे यांना मारू? कसं हे पाप करू? कुलक्षय होईल. संकर होईल, पितर सारे जातील नरकात, त्यांना कोण देईल पिंड न् पाणी...

**दोन** : मुलगे नसतील. मग करतील, मुलगा व्हावा म्हणून, अश्वमेऽध (एक त्याच्याकडं वघतो.) चालूद्या तुमचं.

**पुराणिक** : (ही पिडाच झाली असा भाव) नाही, तो अश्वमेधाचं नाही वोलला.

**दोन** : वरोवर. तो नाहीच वोलला. मी मनातल्या मनात वोललो... होतो.

**पुराणिक** : (आपण जिंकल्याच्या खुषीत) अर्जुनाला कुणाच्या मनातलं वोलणं नको होतं, भगवंताचा उपदेश हवा होता. म्हणून तो बसला त्यांच्या पायाशी. (चेहऱ्यावर स्मित येतं.) श्रीकृष्ण म्हणतात, अर्जुना, अरे हिजडेपणा नको करू. तुला शोभत नाही हे.. अरे तुझा धर्म काय!... लढाई कर, चऽल.

**दोन** : (एकटाच जुवाला जोर लावतो.) पुढाई करायला चाललो होतो. पण हे तिघे जागेवरच, खूर रवून. राहिलो उगी. एवढ्या एवढ्या खुणा कळतात आम्हा घोड्यांना.

**पुराणिक** : कृष्णदेव घोड्याला नव्हते सांगत, अर्जुनाला.

**एक** : पण सरावानं दोघांचीही भाषा कळत होती आम्हांला. आम्हा घोड्यांची बुद्धी काही कमी नसते. म्हणाले की नाही भगवान पुढे, वुद्धौ शरणमन्विच्छ – वुद्धीला शरण जा.

**तीन** : तराजूच्या दांडीसारखी बुद्धी समतोल ठेव.

**चार** : मव्हाच्या गाळात खुतून देउ नको वुद्धी (थोडा आगाऊपणा करून) बुद्धीला शरन जा, चालूद्या तुमचं.

**पुराणिक** : (या चौफेर हल्ल्यानं काहीसा चीत होऊन नकळत हात जोडतो.) अहोऽ त्या अर्जुनासारखं मीसुद्धा तुम्हाला विचारतो, का माझ्या वुद्धीला वांध्यात पाडता? माझं कल्याण होईल असं, एक काहीतरी सांगा.







अनुक्रमणिका

**एक** : (पुराणिकाची नक्कल करीत) असं अर्जुनानं म्हटल्यावर भगवान म्हणाले, यज्ञ करा.

**दोन** : अश्वमेऽध! घोडे वळी द्या. चांऽगले जवान....

**तीन** : आधी खुशाल हिंडूद्या, गावोगावच्या शेतात. खाऊद्या त्यांना, वाटेल ते पीक, होऊद्या त्यांना, माजलेले वलदंड.

**चार** : काढूद्या वाहेर, लांवलचक — (लांवलचक जीभ वाहेर काढतो आणि कचकन चावतो... लगवगीने) चालूद्या तुमचं.

**पुराणिक** : (प्रेक्षकांकडे तोंड फिरवून) चालूद्या काय, यांचं तोंड? वाटलं नव्हतं असतील हे इतके धर्मलंड. (सावरून) प्रत्यक्ष भगवंताचे शब्द आपल्या कानांनी ऐकलेले हे हयात्मे. पण करतील काय. श्रीकृष्ण म्हणूनच गेले, – अर्जुना, प्रकृतिं यान्ति भूतानि. आपल्याला समजेल अशा भाषेत सांगायचं म्हणजे, सगळे जातीवर जातात. यांनी यांचा धर्म पाळला, आम्हांला आमचा पाळला पाहिजे. तर, पुढे चलूया. भगवान त्या कुंतीच्या पुताला म्हणाले, अर्जुना, हा कर्मयोग मी पहिल्या प्रथम विवस्वानाला म्हणजे सूर्याला सांगितला. (एक आणि चार ऐकू येण्याएवढ्या मोठ्यानं हसतात. पुराणिक काहीसा चिडून वोलतो) यात काय झालं हसायला? नव्हतं म्हणाले असं? ऐकलं होतं ना तुम्ही?

**एक** : (शांतपणे) म्हणाले होते. आम्ही ऐकलं होतं. म्हणूनच हसलो.

**चार** : (खोडकर पोराच्या अभिमानानं) तवासुधा हसलो व्हतो. किस्नाताला ऐकू नव्हतं गेलं.

**पुराणिक** : आता वरीक हद्द झाली. का असे वागलात?

**एक** : विचार करा.

**चार** : वुद्धीला शरन जा.

**एक** : चार, मला वोलूदे वघू. हा कर्मयोग पहिल्या प्रथम सूर्याला सांगितला. काऽय केलं सूर्यानं तो ऐकून?

**पुराणिक** : (प्रेक्षकांना) अहो, भगवंताच्या वोलण्यातलं रूपक समजून घ्यायला लागतं. सूर्यदेव म्हणजे कर्मयोग्याचं ज्वलंत, (हा शब्द सुचल्याच्या खुशीत) अगदी ज्वलंत उदाहरण! रात्रंदिवस, (एक कडे वघत) हो हो रात्रंदिवस, जगाला प्रकाश देत फिरायचं. (चारी घोडे हसतात त्यामुळे त्याचा ओघ एकदम थांवतो, चेहरा कसनुसा होतो.)

**दोन** : रथात वसून! लालवुंद गोळा रथावर लादला की संपला त्याचा कर्मयोग!

**तीन** : धनी लोळा, सारथी पांगळा! रथ निखळ सोन्याचा, त्याचे खिळे चंद्रतारे, दोरसुद्धा सोन्याचे.

**चार** : त्याला अधांत्री पळवायचं काम मातर घोड्यांचं! दोन नाही चार नाही सात घोडे लावले! जग जल्मल्यापसून धाव धाव धावले कधीच नाय कावले!

**एक** : म्हणून आम्ही हसलो! रूपक समजून घ्यावं लागतं ना पुराणीक... रूपकाच्या पोटातलं रूपकही समजून घ्यावं लागतं. चालूद्या तुमचं.

**पुराणिक** : (नाइलाजानं सुरवात करतो) यांनी प्रत्यक्ष ऐकलेलं. आम्ही लिहिलेलं वाचणारे. पोथीत आलं तेवढं सांगणारे. भगवान म्हणाले, तोच कर्मयोग विवस्वानानं मनूला, मनूनं इक्ष्वाकूला सांगितला. भगवंतापासून माणसापर्यंत कर्मयोग आला. पण माणूस म्हणजे वऱ्यावाइटांचा काला. कर्मयोगाचा उपदेश त्याच्यावर सरस्वतीच्या लोंढ्यासारखा आला... पण कालांतरानं माणसाच्या विस्मरणाच्या वाळवंटात लुप्त झाला.

**एक** : दुसरं होणारच होतं काय? माणसांची सरस्वती जिभेवरून ओघळते. आणि मुळात ज्यांनी कर्मयोग नुसताच ऐकला, आचरला नाही, त्यांच्याकडून शिकल्यावर, शिकणारे तरी कसे आचरणार? कर्मयोग खरा ऐकला तो आमच्या पूर्वजांनी — कारण ते रात्रंदिवस त्याचा प्रकाश जगाला दाखवीत फिरत होते. त्यांच्याकडून जर माणसांनी तो घेतला असता तर भगवंतांना अशी हळहळ करायची पाळी आली नसती. (पुराणिकाला) होय की नाही?

**पुराणिक** : (तोही माणूसच, घोड्याचं म्हणणं ऐकायला जरा जडच जातंय त्याला.) म्हणून, भगवान म्हणाले, हे अर्जुना, आज मी हा योग तुला पुन्हा सांगितला. हे असं त्या परमेश्वराला पुन्हापुन्हा करावं लागतं. परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्... साधूंचे संरक्षण दुष्टांचे निर्दालन, ते करण्यासाठी आणि खऱ्या धर्माची स्थापना करण्यासाठी युगीयुगी मी पुन्हा जन्म घेतो. त्याचसाठी कृष्ण अवतार झाला. त्या अवतारात सद्‌गुणी माणसांना वाचवण्यासाठी आणि दुर्गुणी माणसांचा नाश करण्यासाठी, काय काय म्हणून केलं नाही त्या भगवंतानं.... (घोड्यांकडं हात दाखवून....) यांची सेवासुद्धा केली (हे सांगताना सुरवातीचा भक्तिभाव वराच ओसरला आहे.)

**तीन** : फुक्कऽट असं वाटतंय ना तुला? (रागानं त्याला पुढचं सुचत नाही.)

**दोन** : अरे मूढा, कारण आम्हीच खरे कर्मयोगी होतो– अजून कळलं नाही का तुला?

**चार** : इराटाच्या दारात अर्जुन आरदनाऱ्यावानी नाचत व्हता तव्हा आन आता हिजड्यावानी वसून राहिला तव्हासुधा आम्ही फुरफुरत व्हतो..

**पुराणिक** : (गर्भगळीत) मला तसं काही म्हणायचं नव्हतं तुमच्यावद्दल. ह्या जमलेल्या मंडळींना कळायला हवं की, भगवंताचा जन्म काय, कर्म काय, दिव्य म्हणजे अगदीच दिव्य असतात. त्यांना हे सगळं माहीत नसतं म्हणून सांगावं लागतं. आता हेच वघा. ह्यांच्यातले कोणीकोणी म्हणतात, कशाला वावा हे फरक - हा व्राह्मण, हा क्षत्रिय, हा वैश्य न् हा शूद्र? अरेऽऽ, माहीत नसलंऽ तर माहीत करून घ्या... स्वतः भगवंतांनी सांगून ठेवलंय, (सुरावर) चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः। (एक मान डोलवू लागतो) तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम्। (एक कडे पाहून आपण जिंकली असा भाव व्यक्त करतो.) अरे ही चार वर्णांची व्यवस्था स्वतः भगवंतांनी घालून दिली. आणि कशीऽ? गुणकर्मविभागशः. ज्याचे त्याचे गुण काय, कर्म काय, विभाग काय सगळं वघून त्याचा वर्ण कोणता ते भगवान ठरवतात. कर्म म्हणजे काम हे तर जाणताच. पण प्रारव्ध कर्मसुद्धा असतं. त्याच्या अनुरोधानंसुद्धा तुमचा वर्ण ठरतो.

**एक** : (एकदा पुराणिकाकडं संमतीनं, मग घोड्यांकडं अधिकारानं, नंतर प्रेक्षकांकडं आत्मविश्वासानं पाहतो.) आणि त्यांनी पुढं सांगितलं, जे आम्ही त्यांच्या मुखातून ऐकलं, ते असं की, अर्जुना, हे सगळं करूनही मी न करणारा असतो हे तू जाणून घे.

**दोन** : कारण ते अर्जुनाला माहीत नव्हतं. आम्हांला आधीच माहीत होतं. (एक चमकतो.)

**तीन** : त्याचं काय आहे, दोन वस्तू तराजूत तोलल्या तर पारडं खालीवर होणारच की नाय? तेव्हा आम्हांला जेव्हा एका दावणीला वांधलं त्यावेळी क्रिश्नदेवांनी पागनीसाला समजून सांगितलं होतं.

**चार** : त्यांची भाशा आमाला कळायची अन आमची त्यानला कळायची. तवा ते म्हनले हे वऽघ.... हे चारी घोडेच.... पन च्यार घरचे च्यार. त्या त्या घरचे वान नाय पन गुन घेउन आल्याले. तवा त्यानला चार नावं द्यायची. वराच खल झाला त्यांचा. पन नुसत्या नावावरनं, ही आता म्हनलं तसं, हलकं भारी कसं व कळायचं? म्हणून म्हनले ह्यानला आकडं द्या.

**एक** : मघाशी म्हणालो होतो की नाही, समजेल तुम्हांला का आमची नावं अशी ते. (पुराणिक मान डोलवतो.) मी सांगितलं ना मी आश्रमात वाढलो. त्यामुळं मला अंक मिळाला एक....

**चार** : (एक ला) ती मागून. पहिल्यानी काय झालं, पागनीस म्हनलं, ज्याचं त्याचं आधी गुन वघा. म्हनुन समद्यांला दुसऱ्या घोड्यांच्या संगं रथाला जूडून पळावलं. तर मी काय कुनाला आवरलो नाय. कसा व आवरंन. ल्हानपनापसून शीकच जर सूत-वाड्यातली, तर पुढंच न्हानार मी समद्याच्या. तवा पागनीस म्हनले, ह्याला मागल्या जोट्याला जुपा. आन म्हनले ह्याला पैला म्हना. तिनवा झाला दुस्रा, दोनवा मंग तिस्रा आन येकाजी झालं चवथा. (एक चा चेहरा उतरतो.)

**एक** : नंतर कृष्णदेव आले आणि ही नावं त्यांनी ऐकली. ज्यांनी स्वतःच सारी व्यवस्था माणसांनासुद्धा घालून दिली होती, त्यांना ही नावं चांगलीच खटकली. ते काय म्हणाले ते सांगितलं तर, पुराणीक, आत्मस्तुतीचा दोप येईल माझ्यावर.

**दोन** : नका घेऊ तो दोप तुमच्यावर. श्रीकृष्ण म्हणाले, अहो, वर्णानां व्राह्मणो गुरुः। तर असं गुरूच्या घरी वाढलेल्या घोड्यालासुद्धा 'चवथा' म्हणायचं वरोवर नाही होणार. त्याची पायरी अशी खाली आणून नाही चालणार.

**तीन** : तेव्हा त्यांनीच सुचवलं, असं करा, त्यांना नावासाठी अंक द्या, क्रमांक देऊ नका. म्हणजे चौथा होईल एक, तिस्रा होईल दोन, दुस्रा म्हंजे मीच की झालो तीन.

**चार** : मी पहिला होतो त्यो झालो चार. करमाचा आकडा गेला अन ह्यो आकडा कर्माला आला.

**एक** : चार, अजूनी तुला नीट समजलं नाइये असं मला वाटतं. धुरेची जागा तुझी तीच राहिली, हो की नाही!

**चार** : राहिली ना, समदं वझं वढायला.

**तीन** : सगळं नाही वरं का चार! अर्धं ओझं मी ओढतो.

**दोन** : तुझ्यापुढं मी असतो, तो काही नुसता नावाला नाही. मीपण ओढीत असतो. अन् लक्षात ठेव, शत्रूचे वाण येतात, माझ्यावर. तुमच्या रक्षणाची जवावदारी निभावतो तो मी.

**एक** : अन चार, तू सारथ्याच्या सगळ्यात जवळ असतोस. पुठ्ठ्यावर थाप मिळते ती तुला, मला नाही. पुढे राहून दिशा






देतो मीच. समजा, मी अडेलतट्टू झालो... काय होईल तू आटापिटा करून?

**चार** : पुठ्ठ्यावर थाप! हूँ : सारथ्याची थाप कवाकवाच मिळती, तुझ्या भुलथापा मातर पहिला झालतो तवापुन ऐकल्यात. आधी माझी जागा पागनीसानी उजव्या हाताला ठरावली व्हती, हाय का नाय? तू काय म्हनलास? 'चार, अरं उजव्या वाजूला राहिलास तर थाप पडंल डाव्या पुठ्ठ्यावर. तसं कशाला, तू ये माझ्या मागं. मंग उजव्या पुठ्ठ्यावर यिईल थाप.' मला खरं वाटलं. तुला, ताकतीचा वढनार तुझ्या मागं पायजे व्हता म्हनून ही थाप मारलीस तुवा.

**पुराणिक** : (एक ची वाजू उचलून धरली पाहिजे हे जाणवून) छे छे, चार, मी सांगतो काय झालं असेल ते. तू पहिला होतास तेव्हा ज्या दिशेनं मोजावं लागायचं त्याच दिशेनं एकपासून मोजायचं म्हटलं तर तुझी जागा वदलायलाच पाहिजे होती.

**चार** : (आता पुरता गोंधळला आहे) वुवा, जातीला जात वळाखती म्हनत्यात ना तुमच्या मानसांत. तसं तुमचं चाललंय. (उपरोधानं) चालूद्या तुमचं.

**पुराणिक** : (प्रेक्षकांकडे) ऐका मंडळी, मघापासून सांगतोय मी, रूपक समजून घेतलं पाहिजे, रथाला दोन घोडेसुद्धा पुरले असते. तरी भगवंतांनी चार का जोडले? रूपक समजून घ्या. हा समाज नीट चालायचा तर त्यात चार वर्ण पाहिजेत... गुणकर्मविभागशः.... समाजरचनेचं ते महान तत्त्व वस्तुरूपानं माणसांच्या समोर उभं करण्यासाठी रथाला चार घोडे लावले. साहजिकच त्यांची जोडणी कशी करायची हा गुंतागुंतीचा प्रश्न झाला. मोजायचं ते उजवीकडून का डावीकडून हाही एक तिढाच होता की नाही? अहो, जानवं उजव्या खांद्यावरून घालायचं का डाव्या, असल्या गोष्टी ठरवण्यासाठी शंकराचार्यांच्या समोर शास्त्राधार होतात. हे काय सामान्य प्रश्न आहेत का? प्रदक्षिणासुद्धा आपण देवाला सुलटी तर मयताला उलटी घालतो. तेव्हा पहिला पहिला का चौथा एक हे ठरवताना करावी लागली थोडी अदलावदल तर चार नी यवढी खळबळ नाही करू. (एक मान डोलावतो.) उलट त्यानि समजून घ्यायला पाहिजे की माणसातली परिपाठी भगवंतांनी जनावरातसुद्धा आणली.

**चार** : आन आमच्या कपाळाव डाग दिलं. (कपाळ पुढं करून दाखवतो.) वघा... च्यार. मानसांच्या कपाळाव का व डाग देत नाई वुवा?

**एक** : चार, अरे आपण सगळे पांढरे... ओळखायची काही खूण तर असावी की नाही?

**चार** : आईला कसं वळखू यायचं रं आपुन? तू काई सफाइ देउ नको. किस्नात मस खरारा करायचा आपल्या सगळ्यानला. पन हे सगळं फोडाफोडीचं काम त्याचं. वर मघाशी ह्ये म्हनलं तसा, करून सवरून नामानिराळा.

**पुराणिक** : हे असं होतं. शास्त्र नीट समजावून सांगायला गेलं तर माणसांनासुद्धा नीट कळत नाही तर घोड्यागाढवांचं काय! (दचकून वोलायचा थांवतो. गडबडीनं मागं सरतो. त्याला काहीतरी दिसलंय. काय ते त्याला समजण्याच्या आत एक घोडी धाडधाड आत येते.)

**घोडी** : ए वुवा, गाढवं कुनाला म्हनतो? ह्या माझ्या लेकरांला? (चारी घोडे माना खाली घालून उभे राहतात.)

**पुराणिक** : (घोड्यांना दमात घ्यायला लागलो नाही तो ही नवीन वला कुठून आली असं वाटून सबुरीनं घ्यायला वघतो, तोंडावर सात्त्विक भक्तिभाव आणून) नाही माउली, हे प्रत्यक्ष पुरुषोत्तमाचे अश्व आहेत हे काय मला माहीत नाही? यांची आई म्हणजे प्रत्यक्ष प्रकृतिमाता. आहाहा, काय प्रकृतीची माया!

**घोडी** : आईची माया लेकरांवर नाय तर काय वुवावर व्हइल का सांग. (त्याच्या तोंडाजवळ तोंड आणीत मोठ्यानं खिंकाळते. पुराणिक गडवडतो. एक त्याला सावरायला वघतो. चार हसतो.)

**पुराणिक** : (हात जोडीत) नाही नाही माते, मीही तुझे एक लेकरूच. माते वडवे, तू स्वतः विवस्वानाची पत्नी, त्यानं कर्मयोग पहिल्यांदा सांगितला. या तुझ्या लेकरांनी तो प्रत्यक्ष आचरून दाखवला म्हणून तो थोडाफार जगात टिकला. (घोडीला हे काही समजत असल्याचे दिसत नाही. हा काकुळतीला आल्याचं पाहून ती काहीशी मवाळते मात्र.) माते वडवे, तुझ्याच पोटात अग्नी वाढला....

**घोडी** : (एकदम खवळते) माझ्या पोटात आग पडायला काय झालंय? भरपूऽऽर खायाला घालतु ना बिचारा. एखांद्याचं खाउनपिउन भलता आळ घिउ नाही कुनावर.

**पुराणिक** : मी पुराणातलं सांगत होतो.

**घोडी** : मीवि कुरनातलंच सांगत व्हती. आऊंदा पाऊसपानी चांगलं झालंय. लईऽ चांगलं गवात आलंय. ह्याऽ कारट्यांलाच माज आलाय. चरायचं टाकून पळून आली.

**एक** : (आपलं विंग फुटतंय असं वाटून) बुवा कथा करतात. कथेत घोड्यांना फार मान दिलाय.

**पुराणिक** : (लगबगीने) हो ना. यांच्या खांद्यावर स्वतः भगवंतांनी रथाचं जू दिलं.

**घोडी** : जू? कवा? धनगरांचा सवसार नेत्यात वाहून ह्ये. पन ती टांग्याची घोडी आमच्यातली नव्हत.

**पुराणिक** : (विनोद करायला बघतो.) उस्मानभाईच्या टांग्याचं घोडं नव्हे. अस्मानातल्या देवाच्या रथाचे घोडे ना हे. अहो देवानिच सांगून ठेवलंय. (सवयीनं प्रेक्षकांकडे वळतो) उच्चैःश्रवसं अश्वानां विद्धि माम् अमृतोद्‌भवम्। अर्जुना, घोड्यांमधे मी उच्चैःश्रवा आहे. समुद्र घुसळून अमृत काढले तंव्हा हा घोडा निघाला....

**घोडी** : आता ग बया! नवालच झालं. अवं, धनगरनी रोज डेराडेरा ताक घुसाळत्यात त्यातनं घोडमुंगीसुधा नाय निघाली कधी. (चारी घोड्यांची चुळबूळ चाललीये.)

**पुराणिक** : (आपल्याजवळ सगळ्या शंकांची उत्तरं आहेत या विश्वासानं, पण घोडीला टाळून प्रेक्षकांकडे मोहरा ठेवीत) नावसुद्धा कसं बघा.... रूपगुणाला साजेसं. उच्चैः श्रवस्... म्हटलं तर कान उंच करून, टवकारून कानोसा घेणारा... (चारी घोडे कान टवकारतात. काही धोका आहे असं वाटून घोडीही कान टवकारते. काही नाही म्हटल्यावर कान पाडते. घोडे मात्र हुकमाप्रमाणे सोंग वठवताहेत.) नाही तर, उंच आवाजात खिंकाळणारा (चारी घोडे एकदम खिंकाळतात. घोडी कावरीबावरी होते. पुराणिक खूप.)

**घोडी** : देवावानि गप बसायचं ति खिकाळायला काय झालं तुम्हाला? आं? का वऽ बुवा, कथऽतली घोडी असली कसली खोटी खोटी. खऱ्या घोड्यांची माहिती हाये का नाई तुम्हाला.

**पुराणिक** : नाइ मंजे, घोडं ठेवायचं आम्हांला परवडतंय कुठं. कथेतल्या घोड्यांना केवढा मान आहे हेच मी या तुमच्या पुतांना सांगत होतो.

**घोडी** : सुतात हायेत तवर पुतं न्हायतर हायेत भुतं. काइ घेतलं का तुमचं तरी नीट ऐकून.

**पुराणिक** : काही तसं काही असं.. पण मी समजून सांगत होतो त्यांना. आता हाच विषय चालला होता... एक दुसऱ्याहून वरचढ कशाला?

**घोडी** : ह्ये पुसत व्हते तुम्हाला?

**चार** : मंजी त्याचं काय की मी सगळ्यात थोरला असून-

**एक** : मी सगळ्यात पुढं का?

**घोडी** : आन ह्या ह्यांच्या भांडनात, बुवा, तुमीवि शिंग मुडून शिंगरांत शिरला व्हय?

**पुराणिक** : देवाचे घोडे म्हटल्यावर आम्हांला त्यांची सेवा केलीच पाहिजे. जन्मभर ज्यांची कथा सांगत आलो त्यांचं दर्शन झाल्यावर उल्हास वाटला. तुम्ही आल्यावर तुमचीसुद्धा नाही का भाकना केली.

**घोडी** : (खदखदा हसते) अवं ही यवांढलं घोडं झालं तरी मानसावानि भांऽऽडत्यात आन तुमी त्यांचं ऐकऽता. ह्ये देवाचं घोडं मंजी काय? तुमच्यासारख्याला मी फसवायची नाय. धनगारांचा सवसार ह्या मुकामावनं त्या मुकामाला न्यायचा असतो ना, तवा त्यांचं द्याव दर वारीला यकाच घोड्यावर लादत्यात. त्यानला म्हनत्यात देवाचं घोडं. मंजी ह्ये द्येवाला वाहून न्हेत्यात ही खरं. पन घोडं ति घोडं आन मानुस ति मानुस... आता, येकयेक धनगरीन नुसती कलाकलाकला करती. मी तशी वागली तर सोभून दिसंल का, सांगा वरं. (उत्तरासाठी थांबते.) सांगा ना.

**पुराणिक** : घोडीमाय, माणसांना तुमच्याइतकं शहाणपण आलं ना, तर आम्हांला कथापुराण करायचीसुद्धा गरज नाही.

**घोडी** : आमच्यात कुठं असतंय व कथा न् पुरान. मीच बघा. चार वर्सात ही चार लेकरं झाली. आझूनवि होतेत. चांगल्या घरी राहिली, देवाची घोडी झाली. चारचार महिने आमच्यासंगं राहिली हेलपाटं घालीत. म्या का ह्यांच्या बापांनी कथा न् पुरानं सांगितल्यात व्हय ह्यानला?

**पुराणिक** : प्रारब्ध कर्म काहीही असलं तरी नित्यकर्म चांगलं मिळालं त्यांना. देवांना वाहून न्यायचं म्हणजे राजयोग घडला यांच्या हातून.

**दोन** : राजयोग! हुईकात सांगायचे भगत आमच्या भाळी राजयोग आहे म्हणून. कपाळी आला फक्त हा आकडा... (मान थोडी लववून प्रेक्षकांना दिसेल असा आकडा दाखवतो.)

**पुराणिक** : (व्यत्ययाला न जुमानता) देवाला यांनी वाहिलं आणि त्याचं फळ म्हणून भगवंतांनी सांगितलं, योगक्षेमं वहाम्यहम्... तुझ्या योगक्षेमाची काळजी मी वाहतो... तुझ्या म्हणजे केवळ दोनच्या नव्हे, तीन आणि चारच्या सुद्धा.

**तीन** : योगक्षेम बरा चाललाय. मायनं नाही का सांगितलं?





**पुराणिक** : (हसून) अहो, नुसता योगक्षेमच नाही.. भगवंतांनी त्याच नवव्या अध्यायात असं आश्वासन दिलंय..

**एक** : सांगा सगळ्यांना नीट, त्या आश्वासनातून दोनला न् मला वगळलंय म्हणून.

**पुराणिक** : याचं म्हणणं तेवढं बरोबर नाही. भगवंतांनी, समोऽहं सर्वभूतेषु, मी सगळ्यांना सारखं वागवतो अशी ग्वाही दिली आहे. आणि आश्वासन दिलं आहे – (चालीवर) मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः। स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास् तेऽपि यान्ति परां गतिम्। अर्जुना, अरे, माझ्या आसऱ्याला आले ते खालच्या योनीतले असोत, स्त्रिया वैश्य शूद्र असोत, तेसुद्धा उत्तम गती मिळवतात.

**दोन** : त्या उत्तम गतीतून आम्हांला वगळलंच की नाही मग? माझी गती सगळ्यात जलद असूनसुद्धा.

**पुराणिक** : (कसं कळत नाही याला अशा अर्थाचं हसून) बाबारे, घोड्यासारख्या खालच्या योनीत जन्म मिळूनसुद्धा उत्तम गती मिळणार हे आश्वासन पुरे नाही का तुला? माणसांतल्या स्त्री वैश्य शूद्रांच्या पंक्तीत तुम्हांला बसवलं –

**घोडी** : लग्नाकार्यात घोड्याला पार मांडवापुतोर न्हेत्यात, पन पंक्तीला कसं ब बसावत्याल मानसांच्या. पुरनाची पूळीसुधा बाहेर आनूनच तोंडात घालत्यात.

**चार** : बुवा त्या पंक्तीचं सांगत नाहीत माय. बायकांलासुधा देव बाप्यासारखंच वागावतो म्हनत्यात.

**घोडी** : कुठलं बऽ. बाप्यापसून बायकांला कष्ट जास्ती, मंजी लईच जास्ती. सरपान काटूक भाकर टुकडा त रोजचंच. आन बर्सा दोन बर्साला लेकरू. लेकरासंगं बकऱ्याकोकराचंबि करायचं. आन पायपिटी? गरवार असली तरच माउलीला घोड्याव बसायला मिळतंया.

**पुराणिक** : त्यांना घोड्याचा जन्म मिळाला असता तर जास्ती सुख लागलं असतं का? सांगा.

**घोडी** : अडान्याला आडवं लावता व्हय बुवा. म्या म्हनलंय का घोड्याच्या जल्मात सुख लागतंय म्हनून. अवं, ज्याचं जिनं तीच जानं. माझा जल्म रानातल्या कळपातला. योकच दादला सगळ्या घोड्यांला सवर करायचा. अवऽ दुसऱ्या कळपातली सवर घोडी आली तर ह्यो तिला गाभडावायचा. असलं तर नाय ना मानसांच्यात.

**पुराणिक** : माणूस म्हणजे काही झालं तरी वरची योनी.

**तीन** : म्हणून तर घोड्यांच्या वर्‌र बसतोय.

**चार** : कुनीकुनी वर बसून दुसऱ्या मानसाला घोड्यासंगं पळायलासुधा लावतोय बरं का.

**पुराणिक** : अरे, शिंगरू नाही का घोड्यासंगं पळत?

**घोडी** : बुवा, शिंगरू जलामल्यादिशीच पळायला लागतंय. मानसाचं लेकरू बर्साचं व्हतंय तवा उभं राहतंय. मानसाला घोड्याच्या मापानि कशाला जोखताय.

**पुराणिक** : जोखीत नाही, मी आपलं उदाहरण सांगितलं.

**तीन** : म्हंजे एक तऱ्हेचं जोखणंच की नाही. आम्ही कायम उभे असतो. झोपसुधा उभ्यानि घेतो. माणसं राहतील का अशी उभी.

**दोन** : अहो, अर्जुनसुद्धा गीता बसून ऐकत होता –

**एक** : अन आम्ही मात्र एका जागी गप्प उभे राहून ऐकत होतो.

**तीन** : पाय अवघडले ते त्या दिवशी.

**चार** : आन मला त त्यातलं कायकाय समजतबि नव्हतं. कट्टाळा यिउन गेला.

**एक** : मला विचारायचंस. मी सांगितलं असतं.

**चार** : भलेऽ. तुला इच्यारायचं, आन किस्नाताच्या हातचा फटका खायचा गडबड केली म्हनून. मधून मधून त्याची थाप मिळत व्हती – उजव्या पुठ्‌ठ्यावर! – तेवढी बास व्हती.

**पुराणिक** : अहाहा! असं समाधान पाहिजे महाराजा. उगाच नाही यांना गीतामृत आपल्या कानांनी पिता आलं. आणि माणसांमधल्या फक्त दोघांना, अर्जुनाला आणि संजयालाच जे पाहायला मिळालं ते भगवंताचं विश्वरूपदर्शन, या प्राणियोनीतल्या चौघांना पाहायला मिळालं. धन्य होत हे.

**एक** : तेवढं बरीक नाही मिळालं पाहायला. अर्जुनालासुद्धा आधी नव्हतं दिसलं, दिव्य दृष्टी मिळाल्यावर दिसलं. आम्हांला कुठं ती दिली होती.

**दोन** : झापडंपण होतीना. नाहीतर आमच्या डोळ्यांना जवळजवळ सगळ्या बाजूंचं दिसतं.

**घोडी** : थेट मागच्या बाजूला मानूस आलं तर नाही दिसत बरं का. (तिच्या मागच्या बाजूनं एक धनगर चोरपावलांनी येतोय. तिला कल्पना नाही, पण पुराणिकाला तो दिसतो. त्याच्या कपाळावर आठ्या चढतात.)

**धनगर** : (पुढे येऊन घोडीच्या बगलेत लहानसा गुद्दा मारतो.) आता दिसलो का. (घोडीचं मानवी मुख काहीसं शरमतं.) समद्या पाड्यात धुंडून आलो. (घोडे एकदम चपापलेले.

त्यांच्याही मानवी मुखांवर गोंधळल्याचे भाव.) कडंच्या वाडग्यात सोंगं खेळतोय म्हनला व्हता.. तिथं पत्त्या न्हाई. ह्या वाजूला आलो तर देवळात वळखीचा आवाज आला. वाईच कानुसा घेतला आन खात्री पटली तवा आत आलो... तुमी त हितं वुवांला गिन्यान शिकावताय.

**पुराणिक** : शिकलो हो, बरंच काही शिकलो यांच्याकडून. आज गीता घेतली होती आम्ही आख्यानाला. या चौघांनी स्वतः ऐकली ना...

**धनगर** : (मोठ्यानं हसतो.) शावास. मंजे वुवा, वाडवडील सांगत आले, गाढवापुढं वाचली गीता. तर तुम्ही घोड्यापुढं वाचली गीता. त्यानला काय वो. त्यांचा कालचा गूंधूळ वरा होता.

**पुराणिक** : माई, काय म्हणताएत दादा. आल्यावरोवर रागावला होतात माझ्यावर.

**घोडी** : घोड्याच्या जातीचा राग मनाव नसतो घ्यायचा वुवा. आन म्या कुठऽवऽ ऐकली तुमची गिता का शिता.

**एक** : दादा, आपला कालंचा गोंधळ तर वराच होता. तो झाल्यावरच आम्ही हे सोंगांचं ठरवलं.

**धनगर** : आरं पन ती सोंगं वाडग्यातच करायची. हिकडं कशाला आलात?

**दोन** : सोंगं वघायला तर कुणी पाहिजे की नाही?

**पुराणिक** : म्हणजे तुम्ही खरे घोडे नव्हेत?

**धनगर** : तसं म्हनलं तर चांगलं घोडमं झाल्यात. पण ते खरं घोडं वाटलं का काय तुम्हांला?

पुराणिक (वनल्यामुळं थोडा ओशाळलेला) मनाचा खेळ असतो. घरून निघताना मनात आलं, मोठे सुदैवी अर्जुनाच्या रथाचे घोडे, गीता ऐकली. त्यांनी, त्याच तारेत होतो, आणि हे चौघे आले. घोडे असून माणसासारखे वोलतात म्हणता, हे खरेच अर्जुनाचे असले पाहिजेत अशी खात्री वाटली.

**तीन** : एवढ्या मोठ्या समाजापुढं घोडेपणात रत्तीभर कसर राहून दिली नाही आम्ही चौघांनीही. आम्हीसुद्धा खूप शिकलो हां तुमच्याकडून.

**घोडी** : चुरुचुरू वोलायला ना. अरं सोंग घोड्याचं अन ढोंग देवाचं.

**पुराणिक** : देव वाटेल ते रूप घेऊन येतो माणसापुढं, माई. त्या रूपाच्या, त्या सोंगाच्या आतला देव वघायला शिकलं पाहिजे माणसानि.

**धनगर** : आमच्यात देव स्वताच येतो कि वो मानसाच्या अंगात.

**चार** : म्हनुन तर दादा, आम्ही घोड्यातलं देव आन मानसातून घोडी व्हऊन आलो.

**घोडी** : मी वरीक न्हाई म्हनली मपल्याला देव का दिवि म्हनुन. म्हनली का वऽ वुवा.

**पुराणिक** : तुम्ही कशाला, मीच म्हणालो ना तुम्हांला. तुमच्या गोंधळात खुशाला देवी व्हा आता.

**धनगर** : येडं का काय वुवा तुमी. वायकामानसानी सोंगं घ्यायची असत्यात का?

**घोडी** : काय म्हनत व्हति मी. वायकांला कोन वागावतंय का सारखं, सांगा.

**धनगर** : वागवू हितुन म्होरं. चला आता. चांदनी उगावली. भुरकुनि दिवसवि उगवंल. मुकाम हलवायचाय. चला निघा. ते पाचवं रावसाहेव नाय घावलं अजून. त्यांला सोधलं पायजे. (निघतो.) वरं येतो वुवा. पोरासोरांचं मनावर नका घेऊ. चलारं. व्हा म्होरं. (चौघे घोडे पुराणिकाकडे पाहत निघू लागतात. पुराणिक स्मितपूर्वक त्यांना निरोप देतो.) त्यांच्या वरावरीनं तुमीवि चला वऽ वाइसाव (घोडी निघते. धनगर सर्वांच्या मागे. तो प्रेक्षकांच्या नजरेआड होण्याच्या क्षणी पुढच्या पाचही जणांचा मोऽठ्याने हसल्याचा आवाज.)

**पुराणिक** : गेले, गुप्त झाले ते अर्जुनाच्या रथाचे घोडे. ज्यांनी भगवंताच्या मुखीची गीता ऐकली. खोटं वाटतंय तुम्हांला? घोड्याचं रूप चढवलेला माणूस घोडा वाटतो की नाही? मग देवाचे गुण चढवलेला घोडा देव वाटायला काय हरकत आहे? असे देव मानलेल्या घोड्यांच्या किती कथा आपण ऐकत आलो, खऱ्या मानीत आलो. मी सारखा सांगतोय. सगळ्यांमधलं रूपक पाहा. त्या धनगरदादांनी सांगितलं, तेव्हा आपण त्या घोड्यांचं सोंग ओळखलं. धनगरांना खरे घोडे, खोटे घोडे चटकन ओळखता येतात. आपल्याला नाही येत. कारण आपला घोड्यांचा परिचय नसतो. म्हणून अनोळखी गोष्टींचा परिचय आपण करून घेतला पाहिजे. धनगरदादांना घोड्याच्या सोंगातली मुलं ओळखता आली. पण पुराणिकाच्या सोंगातला मुलगा नाही ओळखला. मीच तो पाचवा. निघतो मीही. दादांना आणखी शोधायला नाही लावीत. शिवाय, वुवांचे कपडे न पोथी त्यांना नेऊन द्यायचीय. त्यांना गुंगीत निजवलंय वाडग्यात. उठतीलच दिवस उगवताना. उद्या ते वाचतील तुमच्यापुढं गीता. अर्जुनानं ऐकलेली. आज आम्ही वाचली, ती घोड्यांनी ऐकलेली. रामराम.

अनुक्रमणिका

प्रतिसाद

# जीवनशैलीचे प्रश्न

ना.वि. कानेटकर

डॉ. चिं.मो. पंडितांचा 'मे' महिन्यातील *नवभारत* मासिकामध्ये प्रसिद्ध झालेला लेख वाचला. आपल्या लेखात पंडित स्वत:बद्दल असे म्हणतात की, "मी तत्त्वज्ञ नाही, समाजशास्त्रज्ञही नाही, अर्थतज्ज्ञही नाही, मात्र संवेदनशील विचार करणारा आणि सामाजिक बांधिलकी मानणारा सर्वसामान्य नागरिक आहे." हे खरेच आहे, कारण त्यांनी उपस्थित केलेले प्रश्न सर्वसामान्यांनाच येतात (जे विचार करतात त्यांना), तज्ज्ञांना पडत नाहीत. कारण तज्ज्ञ मंडळी फक्त एकाच गोष्टीचा एका वेळेला विचार करतात. त्यांचे स्पेशलायझेशन असते. माणसापुढे सध्या उभे असलेले प्रश्न हे त्याच्या हव्यासापोटी त्यानेच निर्माण केले आहेत. त्याचबरोबर आपण सर्व प्राणिमात्रांपेक्षा व निसर्गापेक्षा श्रेष्ठ आहोत हे सिद्ध करण्याच्या त्याच्या प्रवृत्तीमधून निर्माण झाले आहेत. गरजेपोटी केलेली तंत्रज्ञानाची व विज्ञानाची आराधना आता त्याच्या मानगुटीवर बसली आहे. निर्माण होत असलेल्या सोयी-सुविधांची व संपत्तीची चटक काही लोकांनी चाखली, ती अनुभूती इतरांनी पाहिली आणि प्रत्येकालाच हे सर्व हवेहवेसे वाटू लागले. मग सर्वजण त्याच्यासाठी धडपडू लागले. कार्यक्षम सार्वजनिक वहातूक-व्यवस्था गरजेप्रमाणे वाढत गेली असती तर कदाचित बहुसंख्य लोकांनी स्वत:ची वाहन-व्यवस्था अंगिकारली नसती. पण तसे न झाल्याने व ज्याच्याजवळ स्वत:ची वाहन व्यवस्था आहे त्याची प्रतिष्ठा मोठी आहे असे समजले जाऊ लागल्याने आता ही शर्यत थांबवणे केवळ अशक्य आहे. एक काळ असा होता की, सर्वसाधारण माणूस दैववादी होता; पण आता आपण श्रम, अभ्यास केला तर आपल्यालाही जगातील सर्व सुखसोयी मिळवता येतात, याचे भान जागृत होऊ लागल्याने सर्व चित्र पालटले आहे. माहिती तंत्रज्ञान व प्रसारमाध्यमे यांच्या गेल्या दोन दशकांतील प्रगतीमुळे माणसांच्या महत्त्वाकांक्षा व अपेक्षा वाढल्या आहेत, व काही काळ तरी ही जीवघेणी स्पर्धा व ससेहोलपट पाहात राहावी लागणार आहे, असे दिसते. लोकसंख्या वाढतच आहे. वाढीचा वेग फारतर कमी करता येईल पण प्रजोत्पादन अजिवात थांबवणे शक्य नाही. जगाच्या अस्तित्वाच्या दृष्टीने इष्टही नाही.

१. प्रश्नावलीचे तर्कसंगत व एकच उत्तर देणे अशक्य आहे.

अ) शेतावर किंवा बाजूला खूप जागा उपलब्ध असेल अशा, शहरापासून दूरच्या जागेवर राहात असाल तर निर्धूर चूल किंवा बायोगॅस वापरणे लोक पसंत करतील; पण गावात राहणाऱ्यांना हे शक्य नाही.

ब) आजही ८० टक्के ते ९० टक्के लोक पाटा-वरवंटा, विळी असेच वापरतात. जिथे प्रतिष्ठा जोडली जाते तेथे मग आधुनिक साधनांचा वापर होतो.

क) टिकाऊपणा लक्षात घेता पितळेची किंवा स्टेनलेस स्टीलची भांडी वापरणे श्रेयस्कर राहील.

ड) जेथे घाई नाही तेथे साधा कुकर व सूर्यशक्ती उपलब्ध असेल तेथे सोलर कुकर वापरणे पसंत आहे. आम्ही सोलर कुकरचा मर्यादित उपयोग आजही करतोच.

इ) खाद्यपदार्थ घरी केलेले (मसाले, पापड), मधल्या वेळचे खाणे बहुतांश घरी केलेले. फळे व भाजीपाला स्थानिक उपलब्ध असलेला.

२) घरात काय हवे –

टेबल खुर्च्या - लाकडीच वापरत आहोत. पण लोखंडी वर्ज्य नाही.

दारे खिडक्या - लोखंडी, पी.व्ही.सी.

(३) यापैकी काय नसेल तर चालेल –

व्ही.सी.आर., साऊंड सिस्टिम

(४) प्रवास व वाहन - प्रकार कोणता आवडेल –

रोजचा प्रवास - सायकल, स्कूटर, सार्वजनिक वाहतूक व्यवस्था.

नैमित्तिक प्रवास - सार्वजनिक वाहतूक, बस, रेल्वे.

(५) संपर्कासाठी काय काय हवे - सार्वजनिक टपाल-सेवा, टेलिफोन, एस.टी.डी.

(६) मुलांच्या शिक्षणावर वार्षिक खर्च किती होतो –

सर्वसाधारणपणे आम्ही आमच्या मुलांवर अंदाजे

अनुक्रमणिका

रु. ३०००/- खर्च केला असेल.

(७) घरांत -

कपडालत्ता, सौंदर्यप्रसाधने .... इत्यादिकरिता वर्षाला दोन व्यक्तींसाठी रु. ५०००/- ते ६०००/-

वाचनीय पुस्तके/मासिके वार्षिक रु. ८०००/-

(८) पर्यावरणाचा दृष्टिकोन लक्षात घेऊन –

पाठकोरे कागद वापरतो.

शक्य असेल तेथे पाकिटे पुन्हा वापरतो.

पाठपोठ झेरॉक्स घेतो.

थोडासा वापर प्लास्टिक पिशव्या, वेष्टने यांचा होतो. दैनिक वृत्तपत्राची साप्ताहिक आवृत्ती नसली तरी चालेल.

(९) अ - सर्वोच्च वेतन व किमान वेतन यांचे प्रमाण १० : १ असे असावे.

ब - वेतनाच्या ५० टक्के निवृत्तिवेतन असावे व ते जास्तीत जास्त १५ वर्षे द्यावे.

स्वतंत्र व्यवसाय करणाऱ्या व्यक्तींसाठी असे निवृत्तिवेतन मिळण्यासाठी बचत योजना किंवा विमा पॉलिसी असाव्यात की जेणेकरून त्यांना निवृत्तीची सोय करून ठेवता येईल. हे सर्वांसाठी असावे.

(१०) विकासाचे प्रतिमान किंवा पर्यायी प्रतिमान : आजचे राहणीमान १० वर्षांसाठी गोठवून घ्यायला मी तयार होईन. सुस्पष्ट जीवनविषयक तत्त्वज्ञान कधीच असू शकणार नाही. कारण जीवन प्रवाही आहे व ते सापेक्ष आहे. सर्वांचा विचार करण्याची क्षमता असावी. दुसऱ्या व्यक्तीच्या जागी मी असेन तर मला काय आवडेल, हा विचार मनात सतत जागता पाहिजे. आता संक्रमणाचा काळ आहे. त्यामुळे आणखी काही वर्षे हा त्रास सहन करणे जरुरीचे आहे. व शेवटी आहेरे आणि नाहीरे हे अजिवात नष्ट होणार नाही. सुसह्य करता आले तरी खूप झाले असे म्हणावे लागेल.



---

# आपणच आपली तपासणी करूया

**वेणू पळशीकर**

(मे १९९९ च्या अंकातील चिं.मो. पंडितांचे वरील शीर्षकाचे टिपण वाचून चर्चेसाठी प्रस्तुत टिपण तयार केले आहे. मूळ टिपणातील प्रश्नावलीची उत्तरे सर्वात शेवटी दिली आहेत.)

मानवी समाज अद्याप बाल्यावस्थेत आहे. लहान मुलाला जसे नवे खेळणे पाहिले की ते आपल्याला हवे असे वाटते तद्वत् आपण प्रौढही नवनवीन चंगळवादी वस्तूंकडे आकर्षिलो जात असतो. घरोघरी टी.व्ही., टेपरेकॉर्डर, व्ही.सी.आर., व्यक्तिगत संगणक ही अशाच प्रकारची नवी खेळणी बनली आहेत. घरापासून कामाचे ठिकाण लांब असल्यामुळे नाइलाजाने सायकल ऐवजी स्कूटर वापरावी लागणे, नवरा-बायको दोघेही पूर्णवेळ बाहेरचे काम करीत असल्यामुळे मधल्या वेळच्या खाण्यासाठी विकतचे खाद्यपदार्थ वापरावे लागणे या गोष्टी आपद्धर्म म्हणून स्वीकाराव्या लागतील. पण आज लोकसंख्येच्या स्फोटाप्रमाणे खाद्यपदार्थांच्या दुकानांची संख्या, स्कूटर्सची संख्या यांचाही स्फोट झालेला दिसतो. तो समर्थनीय वाटत नाही. या सर्वांमुळे आपली ज्ञानेंद्रिये पंगु बनत चालली आहेत. हातांना काही पदार्थ (खाद्यपदार्थ किंवा इतर पदार्थ) बनवण्याचे काम नाही, पायांना चालण्याचे काम नाही. गळ्याला गाण्याचे काम नाही (आजच्या सार्वजनिक सभेच्या ठिकाणीसुद्धा सभेनंतर सर्वांनी मिळून राष्ट्रगीत गाण्याऐवजी राष्ट्रगीताची कॅसेट ऐकायची असते.) त्यामुळे आपण हात असून थोटे, पाय असून पांगळे आणि तोंड असून मुके (टी.व्ही. पाहण्याच्या छंदामुळे आल्यागेल्यांशी मनमोकळ्या गप्पा पूर्वीसारख्या होऊ शकत नाहीत) बनत चाललो आहोत. हे भयानक आहे. डिटर्जंट साबण, प्लॅस्टिक पिशव्या इ. गोष्टी पर्यावरणाशी सख्य राखणाऱ्या नाहीत हे आपणा सर्वांना माहीत असते. पण त्या सोयींचा त्याग करताना सोसावे लागणारे क्लेश सहन करायला आपण तयार नसतो.

'निसर्गसृष्टी व मानवजात या दोहोंच्याही हितार्थ विधायक पर्याय शोधायला हवा' असे म्हणून मानवजातीची निसर्गसृष्टी-पासून फारकत करणे योग्य नाही. मानव हे निसर्गाचेच लेकरू

अनुक्रमणिका

आहे. तेव्हा या दोहोंच्याही हितात अभिन्नता, एकरूपता आहे याची जाणीव सतत जागृत ठेवणे गरजेचे आहे. असो.

मानवी देह हेही एक नैसर्गिक यंत्र असून दैहिक दृष्ट्या अपायकारक नैसर्गिक वस्तूंचे सेवन पण आपण सर्वांनीच विवेकपूर्वक वागून टाळले पाहिजे. 'मुंबईने शहापूर तालुक्याचे पाणी वापरणे,... इंग्लंडने आसामचा चहा पिणे' हे जेवढे अनिष्ट तेवढेच आपल्या गावाने आसामचा चहा पिणे अनिष्ट मानले जायला हवे. म्हणजे, आसामनेही आसामचा पिऊ नये कारण त्यात टॅनिन नावाचे विषारी द्रव्य असते. पर्यायी विकासाच्या प्रतिमानात विज्ञान-तंत्रज्ञानाचा धि:कार टाळायचा असेल किंवा स्वीकार वाढवायचा असेल तर विज्ञानाने या अपायकारक गोष्टींना प्रभावी पर्याय शोधले पाहिजेत. म्हणजे आधुनिक तंत्रज्ञानाने चहाची लज्जत देणारे पण त्यात टॅनिन किंवा इतर अपायकारक द्रव्य नसलेले पेय शोधून काढायला हवे. धूम्रपानाच्या बाबतीतही असेच म्हणता येईल. आधुनिक विज्ञान-तंत्रज्ञानाने अपायकारक नसलेली पण इतर बाबतीत धूम्रपानाचं सुख देणारी सिग्रेट शोधून काढावी. चहा आणि सिग्रेट यात एक महत्त्वाचा फरक आहे. चहा पिणारा केवळ स्वतःच्याच शरीराला अपाय करीत असतो. धूम्रपान करणारा बाहेर सोडत असलेल्या धुरामुळे अवतीभोवतीच्या निर्व्यसनी माणसांच्या शरीरांनाही इजा पोचवत असतो. तेव्हां 'माणुसकी भरलेले' पर्यायी विकासाचे जे प्रतिमान येथे सूचित केले आहे त्यासाठी धूम्रपानाला प्रभावी पर्याय शोधून काढणे जास्तच गरजेचे वाटते. चहाच्या संदर्भात कर्मवीर भाऊराव पाटील यांची एक गोष्ट आठवते. भाऊराव सुरुवातीला आसामी चहा ऐवजी स्थानिक परिसरात निर्माण होणारे दूधच पीत असत. परंतु आपल्या सामान्य रयतेला महागडे दूध पिणे परवडत नाही, चहाच प्यावा लागतो, हे लक्षात आल्यावर त्यांनी स्वतःही दुधाऐवजी चहाच पिणे सुरू केले. इतके ते रयतेशी एकरूप झाले होते.

पंडित लिहितात, "गांधीजी घड्याळ, चप्पा, कागद, पेन या वस्तू वापरीत असत. त्या सर्वांनाच उपलब्ध व्हाव्यात. त्याला चंगळवादही म्हणू नये. घड्याळासाठी महाप्रमाण उत्पादन तंत्रविज्ञान (mass production technology), धातुशास्त्र, यंत्रशास्त्र, रसायनशास्त्राचा अभ्यासही हवा." घड्याळरूपी यंत्राइतकेच किंबहुना जास्तच महत्त्व गांधीजी शरीररूपी यंत्राला देत होते. या दृष्टीने आहारशास्त्राचेही प्रयोग ते अखेरपर्यंत करत राहिले. पर्यायी विकासामध्ये पर्यायी आहाराचाही विचार केला जावा. कलिंगडाची साले, शेवग्याची फुले, आंब्याच्या कोयी आज सर्वत्र उकिरड्यावर पडून प्रदूषणाला कारणीभूत होत असतात. वास्तविक मानव म्हणजे निसर्गाचे लेकरू असून वरील गोष्टी निसर्ग-मातेच्या दुधाप्रमाणे पौष्टिक आहेत. शरीररूपी यंत्र सुरळित चालण्यासाठी आज वाया जात असलेल्या वरीलसारख्या अनेक नैसर्गिक गोष्टी उपयोगी पडण्यासारख्या आहेत. याबद्दलचे प्रयोग व संशोधन आपण व्यक्तिगत व कौटुंबिक पातळीवरही करू शकतो. 'अधिक अन्न पिकवा' या मोहिमेएवढीच अधिक अन्न वाचवा ही मोहीम गरीब व श्रीमंत वा सर्वांच्याच शरीरिक स्वास्थ्याला उपकारक ठरू शकते.

इलेक्ट्रॉनिक तंत्रविद्येमुळे घरातील प्रत्येक खोलीत घड्याळ, शाळकरी मुलांच्या मनगटावर घड्याळ असा घड्याळांच्या वापराचा अनावश्यक सुकाळ झाला आहे. ती काळजीची गोष्ट आहे. एन.जी.ओ. पातळीवरील, विद्यापीठीय स्तरावरील किंवा अन्य तत्सम चर्चासत्रांमध्ये फाईली, कोरे कागद, पेन यांची उधळमाधळ होत असते. अशा ठिकाणी पाठकोरे कागदच कटाक्षाने पुरवले जावेत.

'विकासाची आजची संकल्पना कायम ठेवून' केंद्रित व्यवस्थेऐवजी विकेंद्रित व्यवस्थेचे तेथे पोचणे योग्य होणार नाही. इलेक्ट्रॉनिक कॉटेज इंडस्ट्रीमुळे भविष्यकाळात सर्वच चंगळवादी वस्तूंचे विकेंद्रित उत्पादन शक्य होईल असे सांगितले जाते. उत्पादन केंद्रित का विकेंद्रित यापेक्षा उत्पादन खऱ्या मानवी विकासासाठी आवश्यक की अनावश्यक ते पाहिले पाहिजे. गांधीजींच्या काळात स्वदेशी मोहिमेद्वारे सर्व विदेशी वस्तूंवर बहिष्कार टाकण्यात आला. त्याचप्रमाणे आता आपापल्या घरी डिटर्जंट, प्लॅस्टिक व अन्य प्रदूषणकारी किंवा चंगळवादी वस्तूंवर बहिष्कार घालून आपण आपल्यापासूनच सुरुवात करू या.

"माणसांनी आपले आयुष्य पंचक्रोशीतच काढावे की विशाल जगात? माणसांनी गतिशील असावे की स्थितीशील? गतानुगतिकता, एकसुरी पिढ्यान् पिढ्या जीवन जगणे अशी स्थितिशीलता अनिष्टच आहे. पण दुसऱ्या, बाजूला गतिशीलतेत संस्कृतीचे वैचित्र्य, वैविध्य लोप पावत आहे. सर्व जगभर एकछाप संस्कृती आकाराला येत आहे.... गतिशील याचा इथला संदर्भ हा केवळ प्रवासाशी नसून खाणे-पिणे, कपडालत्ता, फावल्या वेळाची करमणूक इ. शी निगडित आहे" फावल्या






वेळेची करमणूक नवनवोन्मेषशालिनी कृतिशील सहभागातून निर्माण होऊ शकते किंवा आपल्या सर्जनशीलतेला वाव न देणारी निष्क्रिय स्वरुपाची (passive entertainment) पण ती असू शकते. घरी सर्वांनी मिळून आइस्क्रीमपॉटमध्ये आईस्क्रीम वनवणे ही पहिल्या प्रकारची करमणूक झाली. या उलट वाडीलालचे किंवा तसेलच दुसरे 'तयार' आईस्क्रीम सर्वांनी मिळून खाणे ही निष्क्रिय करमणूक म्हणता येईल. फावल्यावेळी टी.व्ही.वर काहीही पाहाणे ही निष्क्रिय करमणूक म्हणता येईल; उलट कर्तेपणाच्या भावनेतून आपण स्वतः निवडलेले एखादे पुस्तक वाचणे ही कृतिशील करमणूक म्हणता येईल.

घरगुती साध्या खाद्यपदार्थांऐवजी वाहेरील खाद्यपदार्थांचे आकर्षण हे आजच्या संस्कृतीचे ठळक वैशिष्ट्य आहे. शिळ्या भाकरीचा खमंग चिवडा, शिळ्या चपातीचा स्वादिष्ट लाडू मधल्या वेळच्या खाण्यासाठी वापरता येतात. पण त्यावावतीत घरातील गृहिणीला सर्वांचे सहकार्य लागते. घरात साधे सात्त्विक अन्न तयार असतानाही, 'चला आज वाहेरच सर्वजण काहीतरी छानसे खाऊन येऊ या' असे म्हणून घरच्या अन्नाची नासाडीही कित्येकदा केली जाते.

वेळ पुरत नाही म्हणून वेळेची वचत करणारी अत्याधुनिक उपकरणे स्वयंपाकासाठी वापरणाऱ्या आपणा सर्वजणींकडे व्युटिपार्लरमध्ये खेटे घालण्यासाठी मात्र भरपूर वेळ असतो. साधेपणा म्हणजे गबाळेपणा नव्हे, तद्वत् नीटनेटकेपणा म्हणजे नकलीपणा नव्हे हेही खरे. प्रत्येकाची निसर्गदत्त दातांची ठेवण, केसांचे वळण (सरळ केस, कुरळे केस, राठ केस, मऊ केस), कातडीचा रंग यामध्ये विविधता असली तरी या सर्व प्रकारच्या नैसर्गिक ठेवणींमध्ये एक प्रकारची आकर्षकता असते आणि कृत्रिमपणे या तथाकथित उणिवा दूर करून आपण जास्त सुंदर दिसतो हाही एक भ्रम असतो.

आपण आपला राहणी खर्च कमी करून गरीवांकडे साधन-संपत्तीचा ओघ वळविणे इष्ट हे पटते. पण कोणत्या प्रकारच्या यंत्रणेतून हे साध्य होईल ते लक्षात येत नाही. आज गरीवी हटवण्यासाठी कुक्कुट पालन, दुग्धव्यवसाय, वकरी पालन, शिवणकाम, सायकलचे दुकान यासाठी गरीबांना शासनातर्फे व वँकांतर्फे साधने पुरविण्याच्या अनेक योजना आहेत. पण त्यामध्ये वोकाळलेल्या भ्रष्टाचारामुळे प्रत्यक्ष वाटप झालेल्या साधनसंपत्तीपैकी फारच थोड्या साधनसंपत्तीचा ओघ प्रत्यक्ष गरजू गरीवांपर्यंत पोचतो. मधली गळती आपण कशी थोपवू शकणार?

आज जगभरच्या विकासप्रकियेमध्ये पर्यावरणाचा व माणुसकीचा ऱ्हास आणि वेरोजगारी व विषमता यांची वाढ होताना अनुभवाला येत आहे. याच्याच जोडीला विविधतेने नटलेली देशीय आणि प्रादेशिक संस्कृती नष्ट होऊन जगभर एकाछापाची सर्वंकष उपभोगवादी जीवनपद्धती अनुसरली जात आहे. आजचे जग जीवघेण्या स्पर्धेचे आहे, असे विद्यार्थीदशेपासून मुलांच्या मनांवर विंववले जाते. कुटुंवसंस्था, शिक्षणसंस्था मुलांचे विविधांगी व्यक्तिमत्व फुलवण्याऐवजी एकसुरी साचेवंद शैक्षणिक स्पर्धेमध्ये मुलांनी यशस्वी व्हावे म्हणून जाणूनवुजून त्यांच्या अंगभूत अन्य क्षमतांच्या विकासाकडे काणाडोळा करत आहेत. व्यक्तित्वाची कुचंवणूक, दडपणूक करून केवळ पैसा या एका निकषावर व्यक्तीच्या, समाजाच्या, देशाच्या, एवढेच नव्हे तर जगाच्या तथाकथित विकासाची दिशा ठरविली जात आहे. हे चिंताजनक आहे. 'व्यक्तिविकास रोखून समाज विकास होत नाही' हे खरे आहे पण विपमतावर्धक व्यक्तिविकास समाजविकासाला घातक ठरतो हेही तेवढेच खरे आहे.

'पर्यायी विकासाचे प्रतिमान माणुसकी भरलेले असले पाहिजे' असे प्रस्तुत टिपणात म्हटले आहे. माणुसकी हे नैतिक मूल्य आहे. नैतिक मूल्ये सार्वत्रिक, स्थलकालनिरपेक्ष असतात. 'वृक्षवल्ली आम्हा सोयरी वनचरे' या उक्तीप्रमाणे ती पर्यावरणाशी मैत्री (eco-friendly) राखणारी असतात. स्वेतरांना (दुसरा देश, दुसरा माणूस, वाह्य सृष्टी) स्वतःच्या विकासात सहभागी करून 'सहनाववतु, सहनौ भुनक्तु, सहवीर्यं करवावहै' (सर्वांनी मिळून सर्वांचे रक्षण करावे; सर्वांनी मिळून उपभोग घ्यावा, सर्वांनी मिळून पराक्रम गाजवावा अशा संविभागाचे (sharing), सहभागाचे जीवन. म्हणजे माणुसकीचे जीवन. माणुसकी भरलेले जीवन विज्ञान-तंत्रज्ञानाचा धिक्कार करणार नाही पण पर्यावरणाशी मैत्री राखून त्याचा वापर व्हावा असा आग्रह जरूर धरेल. तसेच ज्या विज्ञान-तंत्रज्ञानाच्या वापरामुळे माणसे उत्पादक रोजंदारीतून वाहेर फेकली जातात. नफा या एकमेव निकषापायी विषमता वाढीला लागते त्या तंत्रज्ञानाचाही धिक्कार पर्यायी विकास प्रतिमानात करावा लागेल.

माणुसकीचा विवेक दाखवणारी माणसे आज क्वचितच दिसतात. त्यामुळेच वहिणावाईसारख्या कवयित्रीला 'अरे माणसा,

अनुक्रमणिका







माणसा, कधी होशील माणूस' असे म्हणावे लागते. आज आपण सर्व माणुसकी हरवलेली माणसे बनलो आहोत. माणुसकीसंपन्न बनल्याशिवाय पर्यायी विकास केवळ अशक्य आहे. माणुसकीचा धर्म म्हणजे काय ते आपणा सर्वांना चांगले ठाऊक आहे. पण अधर्माने वागल्यामुळे आपली सोय व लाभ होणार असतो. मानवजातीची ही गोची अनादीकालापासून चालत आलेली आहे. फक्त मधून मधून मानवतेचे स्फुल्लिंग प्रकट होताना दिसतात एवढेच काय ते.

'माणसाच्याही पुढे उत्क्रांतीचा टप्पा असेल? कोणता?' मानवी उत्क्रांतीतील पुढचा टप्पा म्हणजे गांधीजींनी कल्पिलेला 'विश्वस्त वृत्ती'ने जगणारा माणूस किंवा कांटच्या विचारव्यूहातील 'नैतिक कर्ता' म्हणून जगणारा माणूस असाच असला पाहिजे. नाहीतर अखिल मानवजात आपापसातील सुंदोपसुंदीने एक ना एक दिवस समूळ नष्ट झाल्याशिवाय राहणार नाही.

**भाग दोन : प्रश्नावलीला उत्तरे**

प्रस्तुत प्रश्नावलीत स्वयंपाकघरात अनुक्रमे कशाला प्राधान्य द्याल असा पहिला प्रश्न असून या प्रश्नांची उत्तरे घरातील स्त्रियांनी द्यावीत असे म्हटले आहे. आमच्या घरात स्वयंपाक करण्याचे काम लिंगनिरपेक्षपणे घरातील सर्वजण करतात. पर्यायी प्रतिमानामध्ये तसे होणे इष्ट मानले जाईल असे वाटते. असो.

प्र. १) गॅस, पाटा-वरवंटा, स्टेनलेस स्टील, प्रेशर कुकरचा वापर करतो.

खाद्यपदार्थ घरी केलेले खातो. मसाले, पापड विशेष वापरतच नाही. मधल्यावेळचे खाणे कधी विकतचे, कधी घरचे असते. फळे, भाज्या, मुख्यत्वे स्थानिक पिकणाऱ्या आणि मोसमाप्रमाणे वापरल्या जातात.

प्र. २) घरात लाकडी टेबल व एक लाकडी खुर्ची आहे. घराला (भाड्याच्या) लाकडी दारे, खिडक्या आहेत.

प्र. ३) घरात फक्त रेडिओ आहे. (फ्रीज, टी.व्ही., टेपरेकॉर्डर, साउंड सिस्टिम, व्ही.सी.आर नाहीत)

प्र. ४) रोजचा प्रवास चालत, सायकलने किंवा सार्वजनिक बसने करतो.

प्र. ५) संपर्कासाठी सार्वजनिक टपालसेवा, व टेलिफोन (एस.टी.डी सेवेसह) वापरतो.

प्र. ६) मुलांच्या खेळासाठी, व्यायामशाळेसाठी, खेळासाठी लागणारे कपडेलत्ते यावर शून्य खर्च केला. ड्रॉइंगसाठी, सहलीसाठी, इतर वाचनाच्या पुस्तकांसाठी बऱ्यापैकी खर्च केला. पुस्तकांवर सर्वात जास्त खर्च केला.

प्र. ७) घरात सौंदर्य प्रसाधने वापरत नाही. विको वज्रदंती पावडर, कपडे धुण्यासाठी व अंगाला लावण्यासाठी ग्रामोद्योगी साबण वापरतो. कपडेलत्ते पूर्ण फाटेपर्यंत वरचेवर शिवून वापरल्यामुळे खर्च बेताचा होतो. दुसऱ्यांनी टाकून दिलेले कपडेही वापरतो. वर्तमानपत्रे घेत नाही. वाचनीय पुस्तके, मासिके यावर बराच खर्च होतो.

प्र. ८) पाठकोरे कागद वापरतो. पाकिटे पुन्हा वापरतो. पाठपोठ झेरॉक्स घेतो. प्लॅस्टिक पिशव्या, वेष्टने इ. चा उपयोग टाळतो.

प्र. ९) तथाकथित उच्च कामे करणारे व तथाकथित हलकी कामे करणारे यांच्या वेतनात फार फरक असू नये (कमी प्रतिष्ठेच्या कामाला जास्त वेतन व जास्त प्रतिष्ठेच्या कामाला कमी वेतन देऊन सर्व कामांची प्रतिष्ठा समान करण्याचा प्रयत्न करावा.) निवृत्तीवेतन कोणालाच असू नये. कुटुंबातील वृद्धांना कुटुंबातील तरुणांनी सांभाळावे. तरुणांनी व वृद्धांनी, दोघांनीही आपल्या विकृत व अतिरेकी व्यक्तिस्वातंत्र्याला मुरड घातल्यास हे सहज शक्य आहे. हातपाय हालत आहेत तोपर्यंत वृद्धही आपल्या कुवतीप्रमाणे सेवेची कामे करतीलच. पण तसे शक्य नसले तरी सुद्धा त्यांना सांभाळणे तरुणांनी आपले 'नैतिक कर्तव्य' मानावे.

प्र. १०) आपले आजचे राहणीमान गोठवून साधनसंपत्तीची ओघ गरीबांकडे वळविण्याची इच्छा आहे. पण हे संक्रमण कशा प्रकारे करता येईल ते समजत नाही. तरीही राहणीमान गोठवणे किंवा उत्तरोत्तर कमी करण्याचा प्रयत्न चालूच आहे; कारण त्यामुळे आपण वंचितांच्या अधिक निकट पोचू शकू, आपल्यामध्ये आणि त्यांच्यामध्ये उत्तरोत्तर अधिक बंधुभाव निर्माण होऊ शकेल असे वाटते.



---

टीप. प्र. ९ सोडून इतर सर्वच प्रश्नांच्या बाबतीतील उत्तरांमध्ये आमची सध्याची परिस्थितीच सांगितली आहे. ती फार आदर्श वगैरे नसली तरी इष्ट वाटते.

# '*नवभारत*च्या संपादकीयातील गैरलेखन' – संपादकीय खुलासा

'*नवभारत*'च्या संपादकांना उद्देशून पुढील पत्र काही दिवसांपूर्वी आले :

'*नवभारत*' मासिकाच्या जून १९९९ च्या अंकात 'श्री. देवीदास वागूल आणि आम्ही' असे संपादकीय लेखन प्रसिद्ध झाले आहे. त्यात संपादकांनी श्री. देवीदास वागूल यांचे मूळ पत्र जसेच्या तसे न छापता त्या पत्रातील मजकुरावर मात्र संपादकांनी शेरेताशेरे मारलेले आहेत. हा लेखनप्रकार गैर आहे. वागूल यांचे पत्र पूर्णस्वरूपात छापून मग त्यावर संपादकांनी टीका केली असती तर '*नवभारत*'च्या वाचकांना दोन्ही मजकुरातील ग्राह्य-अग्राह्य काय आहे हे समजले असते. तसे न करता संपादकांनी वागूलांच्या न प्रसिद्ध केलेल्या पत्रातील मजकुरावर शेरेताशेरे मारले हे गैर-लेखन आहे.

'*नवभारत*'कडून इतःपर असे घडू नये, अशी अपेक्षा."

**सतीश तांबे**, पुणे,

**श्यामला वनारसे**, पुणे,

**भास्कर भोळे**, नागपूर,

**विभाकर सुलाखे**, पुणे,

**अतुल पेठे**, पुणे.

या विषयावर हाच मुद्दा करणारे पत्र श्री. शेखर गोडवोले, पुणे, यांचेही आले आहे.

"आपल्या *नवभारत*च्या जून ९९ च्या अंकात आपण लिहिलेला 'श्री. देवीदास वागूल आणि आम्ही' हा लेख वाचला. त्यात आपण म्हणता की श्री. वागूल यांचे पत्र श्री. गळतगे यांचा 'खोटे'पणा 'सिद्ध' करण्याचाच एकमेव मुद्दा मांडत आहे व तो खोटेपणा श्री. वागूल सिद्ध करू शकले नाहीत.

"तसेच श्री. वागूल यांच्या पत्रावर आपण बराच मोठा लेख लिहिला आहे पण श्री. वागूल यांचे 'ते' पत्र आपल्या लेखाआधी का छापले नाही हे कळत नाही. आपण त्या पत्राला अनुलक्षून लेख लिहिला आहे पण वाचकांना 'ते' पत्र मुळांतून काय आहे हे समजणे आवश्यक आहे असे वाटते.

"पुढील अंकात श्री. वागूल यांचे श्री. गळतगे यांचे पत्राला उत्तर देणारे पत्र आपण छापालच अशी खात्री वाटते."

श्री. गळतगे व श्री. वागूल यांच्यातील वाद-विवादा-संदर्भात 'हा विषय येथे संपविण्यात येत आहे' अशी सूचना प्रसिद्ध केल्यावर आम्हाला आलेल्या तीन पत्रांची दखल घेऊन आमची भूमिका स्पष्ट करणारे, ती आम्हाला योग्य का वाटते हे स्पष्ट करणारे संपादकीय आम्ही लिहिले. या पत्रांपैकी दोघांनी त्यांच्या पत्रांमध्ये श्री. वागूल यांनी काही 'खुलासा' वा 'निवेदन' पाठविले तर ते प्रसिद्ध करण्याचा विचार करावा अशी विनंतीही केली होती. ज्यांनी ही विनंती केली ते प्रा. म.अ. मेहेंदळे व प्रा. व.दि. कुलकर्णी या ज्येष्ठ व आदरणीय व्यक्ती आहेत.

श्री. वागूल यांचे पत्र, अपेक्षेप्रमाणे, आले. शेवटचे उत्तर देण्याचा अधिकार आपला आहे, हा श्री. वागूल यांचा एक मुद्दा होता. त्यासंबंधी आमची भूमिका आम्ही स्पष्ट केली.

श्री. वागूल यांचे पत्र, संपादकीय निर्णयालाही अपवाद करून, प्रसिद्ध करण्याची विनंती आम्ही का स्वीकारू शकलो नाही, याचा खुलासा करावयास हवा असे आम्हाला वाटले. वरील दोन व्यक्तींचा आदर करण्याचाच तो भाग होता.

श्री. सतीश तांबे, श्रीमती श्यामला वनारसे, प्रा. भास्कर भोळे, श्री. विभाकर सुलाखे, आणि श्री. अतुल पेठे हे सर्व आमचे व्यक्तिशः परिचित आहेत. तसेच *नवभारत*चे चाहते आहेत. श्री. वागूल यांचे पत्र आम्ही का प्रसिद्ध करीत नाही याचे कारण देण्यापलीकडे आम्ही एक 'शेरा-ताशेरा' मारला आहे असे म्हणता येईल. (अनेक) शेरेताशेरे मारलेले नाहीत. श्री. गळतगे यांचा खोटेपणा श्री. वागूल यांनी नव्या युक्तिवादाने वा पुराव्याने सिद्ध केला आहे असे आढळले असते तर, त्यांचे पत्र अपवाद करून आम्ही छापले असते, असे आम्हाला तेथे सुचवावयाचे होते. असो.

हे सुचविणेही 'गैरलेखना'त मोडते असे आमच्या या मित्रांचे मत आहे याची आम्ही दखल घेतो. लेखनाच्या स्वरूपातील, व अन्यही, कृतींच्या एका साखळीत व्यक्त केल्या गेलेल्या एका शेऱ्याविषयी अशी जागरूकता ही स्वागतार्हच गोष्ट आहे.

लेखकाचे अधिकार, संपादकाची कर्तव्ये, संपादकाने

सांभाळावयाच्या लक्ष्मणरेपा/मर्यादा यांच्या जोडीला लेखकाची कर्तव्ये, संपादकाचे अधिकार व लेखकाने सांभाळावयाच्या मर्यादा हे मुद्देदेखील विचार करण्यासारखे आहेत असे आम्ही आमच्या मित्रांसमोर मांडतो.

श्री. गोडवोले यांनी एक गोष्ट लक्षात घेतलेली नाही. आमचे संपादकीय म्हणजे 'श्री. वागूल यांच्या पत्रावर आपण वराच मोठा लेख लिहिला आहे' असे म्हणता येत नाही.

श्री. गळतगे यांच्या पत्राला उत्तर देणारे पत्र आम्ही का छापले नाही, व छापणार नाही, याचा खुलासा संपादकीयात आलेला आहेच.

श्री. वागूल यांचे पत्र मुळात संपूर्ण वाचण्याची जिज्ञासा असलेल्यांना त्याची प्रत श्री. वागूल यांच्याकडून मिळू शकेल याची आम्हाला खात्री आहे. पण, आमच्या शेऱ्या-ताशेऱ्यात तथ्य आहे का नाही हे पाहण्याचा मुद्दा वस्तुतः, वहुधा, नव्हताच. तसे पाहण्यासाठी *नवभारत*चे जुने अंक काढून श्री. गळतगे व श्री. वागूल यांच्यातील वादावादी व या संवंधातील पत्रव्यवहार वाचण्याची तसदी घ्यावी लागेल. ती घ्यावी अशी शिफारस आम्ही करू धजत नाही.

आता या संपूर्ण विषयावर आमच्या वाजूने आम्ही पडदा टाकीत आहोत. यानंतर या विषयावर आमच्याकडे येणारी पत्रे वा निवेदने वा पत्रके यांची आम्ही दखल घेणार नाही याची कृपया संवंधितांनी नोंद घ्यावी ही विनंती.





अनुक्रमणिका

अनुक्रमणिका








हे मासिक श्री.ग. दीक्षित यांनी मुद्रा, ३८३ नारायण पेठ, पुणे ४११ ०३० येथे छापून मे.पुं. रेगे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका